


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






# दीपावली

सा हि त्य
क ला
सं स्कृ ति




## श्रेयनामावलि

**कथा :**

- **श्रीराम कामत**—तें कबूतर प्रीतीचें
- **स्नेहप्रभा प्रधान**—पतिव्रता
- **माधव कानिटकर**—स्वप्न
- **सौ. नलिनी सुखटणकर**—काळतांडी.

**काव्य :**

- **राजा बढे**—शृंगार श्रीरंग.

**ललित लेख :**

- **डॉ. पु. म. जोशी**—सुरत
- **वसुंधरा पटवर्धन**—ओढ
- **वसंत देशमुख**—गोपिचंदस्नान
- **पद्माकर गोवईकर**—अठरा गुणांचा खंडोबा
- **भय्यासाहेब ओंकार**—कलाकृतींच्या जन्मकथा
- **गोपाळकृष्ण भोबे**—श्रीकृष्णभक्त चैतन्यमहाप्रभु
- **शां. शं. रेगे**—उत्कर्षाचा महामंत्र
- **दि. श्री. कराडकर**-राउंड द विकेट
- **श्रीकृष्ण ठाकूर**—कुत्रा शास्त्रज्ञ आणि मी.

**रहस्यमय सत्यकथा :**

- **चंद्रसेन**—चार लाखांचा दरोडा.

**सदरें :**

- **दीपमाला**—पिनाकि
- गोपालन् सारस्वत
- मुद्राधारक
- **स्फूर्तीची फुलें**—पुष्पा त्रिलोकेकर जयवन्त
- श्रीकृष्ण
- **शेवटचें पान**

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल. दलाल आर्ट स्टुडियो ४०-४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर्ड पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडियोच्या स्वाधीन.

टेलिफोन
४७७६५






अनुक्रमणिका





माघ शके १८८२ फेब्रुवारी १९६१

# श्रीकृष्णभक्त चैतन्यमहाप्रभु

**हरेकृष्ण हरेकृष्ण हरेकृष्ण हरे हरे ।**
**हरे राम हरे राम हरे राम हरे हरे ॥**

या महामंत्राचा उद्गाता श्री चैतन्य महाप्रभु यांचा जन्म शक संवत् १४०७ मध्ये फाल्गुन महिन्याच्या पौर्णिमेला बंगालांतील नवद्वीप नांवाच्या गांवांत झाला. त्यांच्या वडिलांचें नांव जगन्नाथ मिश्र व मातेचें शचीदेवी असें होतें. या वैष्णव संप्रदायी संतानें प्रपंचांत असतांना वयाच्या चोविसाव्या वर्षी न्यायशास्त्रावर एक अपूर्व ग्रंथ लिहिला होता. न्यायशास्त्राचे ते मोठे पंडित होते. जो उत्तम गुणें शोभला, त्याला-त्या गुणांचा द्वेष करणारे—शत्रूहि असायचेच. चैतन्यांच्या बाबतींतहि असेंच झालें. त्यांचा तो ग्रंथ प्रसिद्धीला आला तर आपलें महत्त्व कमी होईल या भयानें समकालिनांनीं अकारण निंदा करायला सुरुवात केली. चैतन्यांनी मागें पुढें पाहिलें नाहीं. आपला ग्रंथ स्पर्धेला कारण होऊं नये म्हणून त्यांनीं तो गंगार्पण करून टाकला व एकाएकीं त्यांना विरक्ति प्राप्त झाली. त्याच वर्षी केशव भारती नांवाच्या संन्यासी महात्म्याची भेट घेऊन त्यांच्याकडून चैतन्यांनी संन्यासदीक्षा ग्रहण केली व ते तीर्थाटनास निघाले. भगवान श्रीकृष्णाची अनन्य भक्ति व श्रीकृष्णदर्शनाची अपार ओढ यामुळें श्रीकृष्णानीं आपल्याला एकवार प्रत्यक्ष दर्शन द्यावें म्हणून दगडाला देखील पाझर फुटेल अशा तऱ्हेचा शोक करीत ते रानोमाळ भटकत असत. नवविधा भक्तीचा, चैतन्यांनींच प्रचार केला; पूर्ण वैराग्य आणि कडकडीत पुरश्चरण या गोष्टींमुळें त्यांना भगवत्कृपा झाली; श्रीकृष्णरूपानें भगवंतांनी दर्शन दिलें. त्यांना अद्भुत अशी शक्ति त्यांना प्राप्त झाली.

त्यांचे अनुयायी त्यांना राधेचा अवतार समजूं लागले; परंतु त्याकाळचे अद्वैतमतवादी संत त्यांना मानीनात. अशावेळीं गोदावरीच्या तीरावर जाऊन राय रामानंदांना चैतन्यांनीं राधाकृष्णाच्या रूपांत दर्शन दिलें. व नित्यानंदप्रभुंना शंख, चक्र, गदापद्मधारी नारायणाचें रूप दाखविलें. वरील दोन्हीं संतहि त्यांचे अनुयायी झाले.

प्रकाशानंद सरस्वती सारखे अद्वैत वेदांती देखील श्री. चैतन्यांनी कृष्णभक्तीला लावले तिथें इतरांचा काय पाड? निष्ठावंत पवित्र आचरणावर त्यांचा अधिक जोर होता. याबाबतींत त्यांचे दंडकहि विलक्षण कडक होते. आपल्या शिष्यांनीं दया, समता, सत्य, उदारता अहिंसा, इंद्रियदमन, गंभीरता, निष्कामता, धैर्य आदि गुणांबरोबरच आपल्या आईशिवाय स्त्रियांशीं संभाषण करायचें नाहीं असाहि एक नियम त्यांनी घालून दिला होता. त्यांच्या हरिदास नांवाच्या एका शिष्यानें आपल्याहून वयस्कर अशा एका स्त्रीशीं संभाषण केलें—म्हणून त्यांनी या शिष्याचा निर्दोष चरित्र असतांना देखील—परित्याग केला.

येशूख्रिस्तासारखेच चैतन्यांनींहि अनेक चमत्कार केले. त्यांच्या नुसत्या दर्शनानें कित्येक कुष्ठरोगी बरे झाले. कित्येक असाध्य रोगानें पीडित असे लोक त्यांनी रोगमुक्त केले.

आपल्या अनुयायी शिष्यांसमवेत एकदां दक्षिण भारताच्या प्रवासांत असतांना, नित्यानंद प्रभूंना मधाची आवश्यकता भासली. नित्यानंद शोध करून दमले; परंतु मध सांपडेना. ज्या शिष्याच्या गांवांत ही मंडळी उतरली होती त्याचें नांव नरहरि ठाकूर असें होते. आपल्या 'श्रीखंड' गांवांत मध कोठें मिळूं नये याबद्दल

पान ६ वर












श्री चैतन्य महाप्रभु

पुंजीभूत प्रेम गोपांगनानां । एकीभूतं भागधेयं यदूनाम् ।
सांद्रीभूतं गुप्तवित्तं श्रुतीनां । श्यामीभूतं ब्रह्म मे सन्निधत्ताम् ।।



अनुक्रमणिका







भक्त ठाकूरांना फार वाईट वाटलें; पण करतात काय ? अखेरीला ही गोष्ट श्रीचैतन्यांच्या कानावर गेली. केवळ मधासाठीं आपल्या शिष्याचें मन नाराज झालें हें ऐकून त्यांना क्षणभर हंसूं आलें. जवळच उभ्या असलेल्या आपल्या एका शिष्याला श्रीचैतन्यांनीं आज्ञा केली—

'जारे त्या सरोवरांत कमंडलू बुडवून हवा तेवढा मध घेऊन ये !' शिष्यानें जवळ जाऊन पाहिलें. पाहातात तों काय ! साऱ्या तलावांतल्या पाण्याचें मधांत रूपांतर झालेलें होते. दक्षिणेंतल्या या सरोवराचें त्या दिवसापासून मधुपुष्करिणी हें नांव विख्यात झालें.

योग, याग-विधि हेंच भगवद्कृपेचें साधन नसून श्रद्धायुक्त अंतःकरणानें हरिनामामृताचा अखंड उच्चार केल्यानेंच भवदुःखाचें निवारण होऊन मोक्ष मार्ग सांपडतो हें चैतन्यानी अखंडपणें प्रतिपादिलें. जाति-धर्म निरपेक्ष असा त्यांचा संप्रदाय होता.

त्यांच्या शिष्य परिवारांत अनेक जातीचे लोक होते.

हरिदास साधु हा मुसलमान होता; परंतु चैतन्यांच्या अनुग्रहानें तो श्रीकृष्ण भक्त झाला. मुसलमानसमाजाकडून यावावर्तीत त्याचा अनन्वित असा छळ करण्यांत आला. अंगिकारलेल्या निष्ठेपासून त्याला पदच्युत करण्याकरितां काजीच्या मसलतीनें कित्येक मुसलमान वेश्यांनी अतोनात प्रयत्न केले. त्या वेश्यांना यश तर मिळालेंच नाहीं; परंतु अल्पावधींतच आपला व्यवसाय सोडून त्या हरिदासाच्या भक्त बनल्या, अखेर त्याच्या मुसक्या बांधून त्याला गंगेंत बुडविण्यांत आलें; पण श्रीचैतन्याच्या कृपादृष्टीनें तो सुखरूप राहिला. श्री नित्यानंद, श्री अद्वैत, रायरामानंद, श्री रूपस्वामी, श्री सनातन, रघुनाथ भट्ट, नरहरी सरकार हे सर्व ख्यातनाम संत श्री चैतन्याचे शिष्य होते. व आपल्या परात्पर गुरूंच्या नवविधा-भक्ति तत्त्वाचा प्रचार त्यांनी जोरदारपणें केला.

प्रपंचांत मग्न राहूनहि उत्तमरीतीने परमार्थ साधतां येतो. परमार्थ-साधनाकरितां संन्यास वा अन्य कोणताहि दंड-योगच हवा असें नाहीं. आसनीं, भोजनीं शयनीं शुद्ध भावानें मुखांत हरिनामामृताचा सतत ध्यास धरल्यानें संतपदाची जोड मिळवतां येते. हेंच चैतन्याच्या उपदेशाचें सार आहे. म्हणूनच आपल्या कांहीं शिष्यांना त्यांनी गृहस्थाश्रम पत्करायला लावला.

नित्यानंदप्रभूनींहि संन्यास दीक्षा घेतली होती; परंतु चैतन्यांनी त्यांना गृहस्थाश्रम स्वीकारायची आज्ञा केली व नित्यानंदानी मागाहून गृहस्थाश्रम स्वीकारला.

रूप-सनातन नांवाचे दोन भाऊ. दोन्ही चैतन्याचे अनुयायी होते. नबाब हुसेनखाँच्या दरबारांत दोघांनाहि फार मोठा मान होता. 'दबीरखास' व 'साकरमल्लिक' अशा पदव्यांनी ते विभूषित होते. त्यांनी गौडीय वैष्णवसिद्धांतांचें प्रतिपादन करणारे अनेक ग्रंथ आणि टीका लिहिलेल्या आहेत. श्री चैतन्यांच्या तत्त्वाचा प्रचार करणारे महान संत अशी वैष्णव-समाजांत त्यांची ख्याति आहे. व हे दोघेहि बंधू गृहस्थाश्रमी होते. • • •



स्वातंत्र्यदिन चिरायु होवो



अनुक्रमणिका

या महिन्यातील
माननीय व्यक्ति



## ब्रिटनची साम्राज्ञी

# एलिझाबेथ

"एका पिढीनंतरहि जगांत राण्या राहिल्याच तर ही मुलगी उत्तम राणी होईल." एका विख्यात कादंबरी लेखिकेचें हें भविष्य आज खरें होत आहे. वयाच्या १४ व्या वर्षी एलिझाबेथ हिनें नभोवाणीवरून ब्रिटन व राष्ट्रकुलांतील मुलांना उद्देशून जें भाषण केलें, तें अप्रतिम भाषण ऐकून वरील उद्गार त्या कादंबरी लेखिकेनें आपल्या दैनंदिनींत लिहून ठेवले. राणी एलिझाबेथ यांचा जन्म दिनांक ११ एप्रिल १९२६ रोजीं लंडन येथें झाला. राजे सहावे जॉर्ज यांची ही पहिलीच मुलगी. राजकुमारी मार्गारेट तिच्यापेक्षां चार वर्षांनीं लहान. दोन्हीं बहिणींचें शिक्षण राजघराण्याच्या रीतिप्रमाणें घरींच पूर्ण करण्यांत आलें. ड्यूक ऑफ यॉर्क हे राजे सहावे जॉर्ज म्हणून गादीवर आल्यानंतर साहजिकच एलिझाबेथ गादीच्या वारस बनल्या. काळाचीं पावलें ओळखून त्यांनीं इतिहास, राज्यघटना, कायदा इत्यादि विषयांचा अभ्यास सुरू केला. वयाच्या अवघ्या सोळाव्या वर्षी 'ग्रेनेडियर गार्डस' च्या कर्नलपदीं त्यांची नेमणूक झाली व १८ व्या वर्षी 'कौन्सेलर ऑफ स्टेट' म्हणून नेमणूक करण्यांत आली. राजांच्या अनुपस्थितींतले सर्व अधिकार त्यांना प्राप्त झाले होते. दुसऱ्या महायुद्धाच्या कालांत स्वयंसेविका म्हणूनहि बहुमोल कामगिरी त्यांनीं बजावली होती.

इलिझाबेथला घोड्यांची निगा राखण्याचा फार नाद आणि अश्वविद्येंतील तिचें नैपुण्य आज त्या क्षेत्रांतील नामवंतांनींहि वाखाणलें आहे. राजकन्या असूनहि तिनें गर्लगाईडमध्यें नांव दाखल केलें होतें.

दुसऱ्या महायुद्धानंतर इलिझाबेथची लोकप्रियता विशेष वाढली. देशांतील अनेक संस्थांकडून तिला समारंभाची अध्यक्षस्थानें स्वीकारण्याबाबत आमंत्रणें येऊं लागली. आणि आपल्या मनमोकळ्या आणि दिलखुलास व्यक्तिमत्वामुळें इलिझाबेथ ब्रिटिश बेटांतील कानाकोपऱ्यांत लोकप्रिय झाली.

वयाच्या एकविसाव्या वर्षी लॉर्ड माऊंटबॅटनचा भाचा प्रिन्स फिलिप यांच्याशीं त्यांचा विवाह झाला. व बाविसाव्या वर्षी त्या माता झाल्या. प्रिन्स चार्लस् हें त्यांचें पहिलें अपत्य. यानंतर पतिसमवेत एका दौऱ्यावर त्या गेल्या असतांना एकाएकीं राजे सहावे जॉर्ज स्वर्गवासी झाले. व परंपरेप्रमाणें एलिझाबेथची राजगादीवर नेमणूक झाली. २ जून १९५३ या दिवशीं त्यांच्या राज्यारोहणाचा अपूर्व समारंभ झाला.

अत्यंत चतुर, कार्यक्षम, दयाळू असा राणींचा लौकिक आहे. व 'राणीची कारकीर्द देशाला हितकारक असते' असा इंग्लंड देशांतील लोकांचा दृढ समज आहे.

राणी राज्यावर आल्यापासून आतांपर्यंत तरी कांहीं बाबतींत इंग्लंड आघाडीवर असल्याचें दिसतें.

राणी एलिझाबेथ या ब्रिटन, कॅनडा, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, द. आफ्रिका, नायजेरिया इत्यादि प्रदेशांच्या साम्राज्ञी आहेत. या देशांचा राज्यकारभार राणींच्या नांवें चालतो व प्रजाजन राणीशीं एकनिष्ठ असतात. भारत प्रजासत्ताक बनला; पण राष्ट्रकुल-प्रमुख किंवा 'राष्ट्रकुलाच्या स्वयंस्फूर्त संघाचे प्रतीक' म्हणून त्यानें राजपदास मान्यता दिली. व तोच मान राणीला भारताकडून दिला जातो.

राणी एलिझाबेथना एकंदर तीन अपत्यें. दोन मुलगे व एक मुलगी. राणींना संगीताची फारच आवड असून स्वतः त्या एक दर्दी आहेत व पियानोहि उत्तम वाजवतात. संगीत नाट्य या कलांना त्यांची सक्रीय सहानुभूति असते

राणींची भारत भेट ही फार मोठी गोष्ट समजली जाते.

स्वतंत्र भारतांत राणीचें स्वागत अपूर्व असें होईल यांत शंका नाहीं. या पारंपारिक दैवी शक्तीचे याप्रसंगीं [illegible]







अनुक्रमणिका



क्षणिक वैफल्याच्या या जाणीवेनं मन असंच कधींतरी घायाळ होतं. हुरहुरतं, चुकचुकतं, रुखरुखतं. आणि कां तें सांगतां येत नाहीं.

आज कळत आहे कीं, जगणं हा देखील एक व्यवहार आहे. जीवनाकडे बघण्याची ही व्यवहारी दृष्टि मुळांत नसली तरी वय वाढत जातं तशी आपोआप येते. आणि पुढंमागं अनुभवांच्या जमाखर्चाची खातेवही तपासून पहाण्याची लहर आली कीं उमगतं—कित्येक खातीं तशींच अर्धवट, कायमचीं मुदतींतून गेलीं आहेत !

अर्थात कोणी हें कबूल करील, कोणी कबूलच करणार नाहीं. पण प्रत्येकाच्या आयुष्यांत कधीं ना कधीं असे प्रसंग येतात. एकादा. अधिकसुद्धां. येतात आणि जातात. कांहीं, कांहींसुद्धां – न होता निघून जातात. मागाहून वाटतं मात्र...छे ! बरं नाहीं वाटत.

अजून तो प्रसंग मला आठवतो. अगदीं कालचा वाटण्याइतका ताजा आहे. आणि तरीहि या गोष्टीला दहा, नाहीं बारा वर्षं लोटलीं असतील. ज्यूनीयरला होतों मी. उन्हाळ्याच्या सुट्टींत गांवीं कोंकणांत गेलों होतों....

खेडेगांव. बरोबरीचं कुणी नाहीं. या वयांत आईभावंडाबरोबर बोलत बसण्यांत मन रमत नाहीं. सिनेमा नाहीं, लायब्ररी नाहीं, माणसांनीं फुललेले आणि रहदारीनं गजबजलेले रस्ते नाहींत. दोनच दिवसांत गांवाचा मला कंटाळा यावा हें साहजिक होतं. आणि तरीही कॉलेज उघडेपर्यंत सक्तीच्या या अन्नाडी वातावरणांतून सुटका नव्हती.

कोंकणच्या निसर्ग सौन्दर्याची ललित, उत्तान आणि रोमहर्षक वर्णनं वाचून माझ्या अरसिकपणाचं एकाद्याला हसूं येईल. खरं आहे. निसर्गाच्या मदभरी इष्काची मातब्बरी मला बिल्कुल नव्हती. घरालागूनच खालीं कुळागर होतं. पाटाचं पाणी तिथं सतत झुळझुळ वहात असायचं. माडा पोफळींत वारा भरला कीं सारखी सळसळ सुरू असायची. ती झुळझुळ–ती सळसळ ! माणसाच्या जीवनाशीं प्रत्यक्ष संबंध नसलेल्या या जीवनकाव्यानं माझ्या अंतर्मनाचा वेध कधींच घेतला नाहीं.

# तों केवळ प्रीति

एक दिवस घरासमोरच्या ...कडे पाठ करून गॅलरींत कठड्याला टेकून उभा होतों तर घराबरच्या आडरानांत अचानक कोणीतरी हटकलं—

"कोण र त्यो ?"

हटकलें होतं दुसऱ्याच कोणाला ! पण इकडे माझी तंद्री खाडकन् उतरली होती.

"मीच त्यो." सवालाला परस्पर जाब देखील मिळाला होता. आणि तशी माझी उत्सुकता आणखीन् वाढली. कान फटकारून मी ऐकूं लागलों. डोळे फाडून बघूं लागलों.

"देवासारखा गमलास बघ !" ती सांगत होती.

"देवाच धुनत्यात मला !" त्यानं सांगतलं.

"धाडुळ वाटे बयस नवी हाय र ...."








*आणि......आणि कधीं नाहीं ती बायेला आजच भीति वाटू लागली होती. बरं न् वाईट सगळं कांहीं सुचूं लागलं होतं. जग काय म्हणेल याची खंत करावीसं वाटूं लागलं होतं, गांवचे हजार डोळे सर्वत्र फिरतांना दिसू लागले होते........*

---

" मजी ? " त्याच्या आवाजांत जाम अविश्वास होता.

" मस पक्का माहीत. ह्या टैमाला दुसरा कोनी नाय, पुन देवा भूत्या ठिवलेला. " देवजी —"

" आँ ! "

" देवजी..." तिनं पुन्हां साद घातली.

" मस साद दिलीस ? "

" दुसरा कोन हाय हथं ? "

" तें बी खरं ! पुन सांगाया होवंच. मस देवजी कोन म्हुणत नाय. काय ? कुनो काय-कुनी काय ! दारूच्या नशेंत लाख बोलत्यात तथापि देवजी या नामानं कुनी कधीं हटकलं नाय ? काय..."

" लोकाचं न्हावूं दे "

" तू काय एगळो हायस."

" हायच मुळीं, आन् म्हूनच दारू पिऊन नाय. शाप शुद्दींत तुज देवजी म्हुणन मी. "

" तूं कायबी म्हुणशील. आन् तुज तें मस्त सोबलवी. "

तशी ती खुदकन् हंसली. म्हणाली, " न्हावूं दे रे ! "

" न्हायल. "

" चल माज्यासंगं."

" कुठं ? "

" रानात. "

" तथं आणीक काय हाय ? "

" लई म्हंजे लईच परस्न करतूस." लटक्या रागान तिनं दटावलं. अवचट ओठ मुरडले. सरळ धक्का देऊन हिसक्यानं ती देवाच्या अंगावरून गेली. आणि तरीही जातां जातां आडवं पाहिलं. उभा डोळा घातला.

" अग व्हय गो ! पुन काय वऽकेलं मी ? "

बिचारा देवा ! दारून अर्धा झालेला. आतां ठार मुडदा झाला. तो शब्द विसरला, बोलणं विसरला, चालणं विसरला. सरळ घरची वाट. पण वाट् तीसुद्धां विसरला. तिच्यामागं, केवळ तिच्या मर्जीखातर फरफटत तो जाऊं लागला.

आणि तीं दोघं आडरानांत शिरलीं. मावळत्या संधिप्रकाशांत त्यांच्या पाठमोऱ्या आकृती अस्पष्ट, अंधुक, दिसेनातशा होईतों मी बघत होतों.

तिचं नांव काय ?

ही बाय म्हाताऱ्या गिरजेची लेक. आमच्या कुळागारांत त्यांचं खोपट होतं. घरांत दोनच माणसं—म्हातारी गिरजा आणि तिची ही लेक. हें तें, इकडे तिकडे करून ओढलेला दिवस रेटत.

बाय माझ्यापेक्षां तरी चार पांच वर्षांनीं मोठी. तिचं लग्न झालेलं होतं. लग्न झालं आणि दहापधरा दिवसांत नवरा जांच देई म्हणून नवरा आणि त्याचं नांव टाकून ती माहेरी येऊन राहिली. तिचा नवरा हाताला धरून जबरीनं तिला परत नेणार होता. गांवांत सुरवातीला खूप दिवस तशी आवई होती. या गोष्टीला आज तरी चारपांच वर्षं उलटलीं होतीं. अद्याप बायचा नवरा आलेला नव्हता. त्याला बहुदा सवड नसावी. दुसरे खूप धंदे असावेत...

अशी ही बाय !

ती—तीच ही ! आणि तरीहि वेगळी. हिला मी पाहिलं होतं पण अशी पहिल्यानंच पहात होतों. हिला मी ओळखत होतों. पण आजची ओळख नवीन होती. आणि हें सत्य होतं.

आयुष्यांत पहिल्यानंच बायचा मी विचार करीत होतों. नको तो विचार करीत होतों. आणि नको तेव्हां—

सूर्यान डोंगराआड काळं केलं होतं. प्रकाशाच्या क्षितिजांना आग लावून काळोख सावल्यांची भूतावळ उठवीत पसरत होता. हुरहुरीचे उसासे टाकत वारा स्तब्ध पडला होता. बाजूच्या जांभळीवर वाघळं उलटी फडफडत होतीं. उष्टीं जांभळं खालीं टाकत होतीं...

आणि तासाभरानं बाय जेव्हां आमच्या घरीं आली तेव्हां मी नेहमींचा बावळट नंदू राहिलों नव्हतों. एकदम चारपांच वर्षांनीं मोठा झालों होतों.

बाय एकटी नव्हती. पुढं ती आणि मागं देवा भूत्या.

ओटीवर मला उभा देखून बायनं नेहमींच्याच ढेंचांत सांगितलं, " बगत न्हायलास त्यो, हात लाव जा देवाला. "

" पहिला हात लावणार तुला." मी बोलून गेलों. आणि मग ध्यानांत आलं, केवढीतरीच बोललों आपण. केला तर वाईटहि अर्थ होतो या वाक्याचा.

आणि बायनं नेमका तोच घेतला.

" मस हात लावनाऱ्याचं तोंड बगा." डोळे मोडत तोऱ्यांत तिनं म्हटलं, " जा. हात लाव त्याला. "

आणि निमूट मी तो हुकूम मानला. देवाच्या ओझ्याला हात लावून तें खालीं उतरलं, आणि तसाच उभा राहिलों.

" आन् मला हात कोन लावील र ! " अर्धवट हसत, अर्धवट खिजवत बायनं म्हटलं.

खालच्या मानेनं मी पुढं झालो..

**श्रीराम कामत**

तेव्हां फक्त मलाच ऐकूं जाईल अशा आवाजांत ती पुटपुटली, " सांभाळ जरा ! चुकून हात लागेल बुजा देवा.

न जाणें त्या आवाजांत कसली सत्

होती—आपुलकी होती. तिनंच मला धीट केलं. माझा मला मग मी तिऱ्हाइत उरलों नाहीं.

बायच्या मानानं मी चांगलाच उंच होतों. तिच्या डोक्यावरच्या ओझ्याला हात लावायचा म्हणजे वाकणं भाग होतं मला.

आणि तेव्हां माझी मान खालीं गेली नाहीं. डोळ्यांनी मुर्वत ठेवली नाहीं. प्रसंगाला धिटाईनं ते वर उसळले. बायला त्यांनी जवळून टिपली. कॅमेऱ्यानं छायाचित्र टिपावं तसं. तिच्या खोल डोळ्यांत दाटलेलं घडद आभ त्यांना दिसलं. त्या मळभांत धुंदींत बेबंद होऊन झेपावणारीं पाहुल्यांचीं पाखरं त्यांनी पाहिलीं.

डोळ्यांनी मेंदूला तांतडीची तार टोकली. मेंदूनं हृदयाकडे विचारणा केली. तारावर तारा. शरिराच्या राज्ययंत्रणेची एकूणएक चाकं झपाट्यानं फिरूं लागलीं. आणीबाणीची परिस्थिति पुकारण्यांत आली. डोळ्यांना मग खास अधिकार मिळाले...

उगाच नाहीं !

ओझं खालीं ठेवल्यावर बायचा पहिला हात गेला पदरावर. आणि माझ्यासमोर तिनं एकदां जी खालीं मान घातली ती मग वर उचललीच नाहीं. आणि आई थांबायचा एवढा आग्रह करीत होती पण बायला आज बिलकुल सवड नव्हती. मात्र जातां जातां आईला ती म्हणाली होती, ममईला ऱ्हाऊन बाकी नंदू मोठा झाला हां वयनी. ''

एक माझंतरी चुकलं होतं ! किंवा तिचं चुकत होतं.

तिला निघालेली बघून भूत्यानंही कांबळं झटकलं.

त्याला बायनं फर्मावलं, '' तूं ऱ्हा हिथंच. माज्या खोपटांत खानार काय र तूं ? आन् मी म्हून घालनार काय ? वयनी घालल जेवाया. प्वाटभर जेव. तुज्याच नाय माज्याबी वाटचं. आन् वयनी दील ते पैसे घेऊन उद्या दीस दारू पीत बस उद्यां ! कसं ?...

बाय निघून गेली.

ओटीवर देवा भूत्या तिच्या नांवानं बोटं मोडत बसला.

बाय रागवून गेली नव्हती.

मला हें कळायला हवं होतं. पण शुद्धीवर असेन तर ना !

हें असंच चाललं होतं. तर्क चुकत होता, अंदाज चुकत होता, गणित चुकत होतं.

चार दिवस !

आणि इथं तर प्रत्येक सेकंद ज्यायला बोचत न् टोंचत चालला होता.

आतां हेंच बघा ना ! इथं या बांधावर बाय नारळींना पाणी लावत होती. ओटीवरून पाहिलं आणि तसा पुढं झालों होतों मी. पण माझा डोळा चुकवून ती निसटली होती. ... डोळ्याआड झाली




जांभळं मात्र टपटप् अंगावर पडत होतीं, फुटत होतीं. सगळा शर्ट खराब झाला होता आणि तरीहि या गोष्टीकडे माझं लक्ष गेलं नव्हतं.

काय नशिब आहे ! त्रासून मी वर पाहिलं.

आणि जरा उशिरांच असेल ! माझं लक्ष तिच्याकडे गेलं. जांभळीच्या झाडावर आडव्या फांदीला टेकून ती उभी होती. फार उंच नाहीं—आणि नुसतीच उभी नव्हती. खालीं माझ्याकडे बघत होती. केव्हांपासून देव जाणे !

'' म्हणजे ? हे धंदे तुझे तर ? ''

'' धंदे ? '' तिचा उलट प्रश्न.

'' हें...हें काय ? शर्ट खराब केलास. '' शर्टावरचे जांभळांचे डाग दाखवीत मी म्हटलं.

'' चू चू खमीसावर जांभळं पडलीं बघ तुज्या. '' तिनंच मला सांगितलं. जशी काय ती त्या गांवचीच नव्हती.

'' पडलीं नाहींत. तूं टाकलींस. ''

'' मी...मी टाकलीं ? '' आणि ती उगाच हंसली. मान मोडत आणि डोळ्यांची रसरशीत जांभळं तोलत, '' मी कशापायीं टाकूं र बाबा ? ''

'' असते एकाद्यां वानराला संवय. ''

'' असली तर असूं दे. पुन वाऱ्यानंबी पडत्यात जांभळं. '' तिनं सांगितलं, ''

'' ममईला ऱ्हावून बाकीं नाय तें सिकलास. पुन ही एक सादी गोस्त इसरलास बघ. ''

बाय पुन्हां मोठ्यानं हंसली. हंसण्यासारखं कांहीं नव्हतं. आणि तरीहि तिला हंसूं येत होतं.

'' आन् तुज ठावं नाय दिसत. '' हंसतच तिनं म्हटलं.

'' काय ? ''

'' अंगावर जांभूळ पडल तर बरं. शेकून हाय. ''

'' शकुन ? ''

'' व्हय. भाग्याचं लक्षन. ''

'' आमचं भाग्य सध्यां रुसलं आहे. आणि...आणि झाडावर जाऊन बसलं आहे. '' मी बेधडक सांगून टाकलं.

'' आन् तूं र ? '' बायचा आवाज खालीं आला होता. जड झाला होता. गूढ झाला होता.

'' ... खालींच आहे. वाट बघत. ''

'' कोनाची ? ''

'' माझ्या भाग्याची. तुझा काय अजमास आहे बाय ? ... तें भाग्य खालीं उतरेल ? ''




"चल. यडा आहेस." तिनं मत दिलं.

"आधीं नव्हतों. चार दिवसांपूर्वी अशीच एक वेडी भेटली. म्हणाळी मुंबईला राहून मोठा झालास हं तूं नंदू. ती म्हणाली खरं असं. आणि तसा मी वेडा झालों."

"मग ह्या यडावर उपाय ?"

"तूंच सांग."

"माजं कपाळ." तिनं कपाळाला हात लावला....आणि मग ती हंसली. अशी गोड हंसली. हळूच म्हणाली, "ला नारऽ ? कुनी देखल—"

"मलाच पाहील होय ?"

"मी ही अशीच. गांवाला हाय ठाऊक"

"मग तुझ्याबद्दल गांवाला माहीत नाहीं तेंच सांग मला."

"हात् तुजी ! मी बरी सांगन."

"कां ?"

"अर सांगायचं नसतं त्यें. वलखयाचं आपलं आपून."

"म्हणजे ? उखाणाच दिसतो."

"व्हय. असा हाय उखाणा—

अरेरे म्हटलं, पाणी परतलं.

यडगांवचं खुळं पेडगांवला भेटलं.

बायनं दिली ओसरी, झट हातपाय पसरी.

सोडलं तर चावतं, आन धरलं तसं डसतं."

बायनं उखाणा पुरा केला आणि अधिकउणं बोलायला मग तिच्यापाशीं शब्दच उरले नाहींत. फांदीच्या आडोशानं तोंड दडवून ती निमूट उभी राहिली.

"बाय..." अर्धवट शुद्धित, अर्धवट भ्रमांत मी साद घातली. वरचं अस्मान खालीं जमिनीला भेटायला उतरत असलेलं मला दिसत होतं. हेंच तिला मी दाखवत होतों, सांगत होतों. आणि तितक्यांत अस्मान जमिनीला म्हणालं, "तू मला आवडतेस—भारी आवडतेस." मला तें कळत होतं, ऐकूं येत होतं. जसं कळलं, जें ऐकलं—तेंच मी बायला सांगितलं.

आणि ती एकदम ओरडली, "नंदू—तात्या."

बायच्या तोंडून तात्याचं नांव निघालं मात्र आणि जीव घेऊन घराकडे मी धूम ठोकली. मागं पाहिलंसुद्धां नाही.

जळत्या जखमेवर फुंकर घालून आग थांबत नाहीं. आणि गळत्या जखमेवर मीठ चोळून घाव भरत नाहीं व्यवहारांतल्या गोष्टी या रोजच्या अनुभवांतल्या. खरं म्हणजे बायला कळायला हव्यात. पण कळत मात्र नव्हत्या.

चारचौघांपेक्षां माझ्यांत तिनं कांहींतरी वेगळं पाहिलं होतं. साहजिकच गांवांत इतरांना लागू असलेले नियम माझ्या बाबतींत बाद होते. मला वेगळी वागणूक मिळत होती—खास वेगळी. माझ्या मतें याला अर्थ नव्हता, कारण नव्हतं. आणि मुख्य म्हणजे खुद्द मलाच तें नको होतं.

पण मला काय हवं होतं तें माझ्यापेक्षां बायलाच अधिक माहीत होतं. तिला तें लाख ठाऊक होतं. आणि...आणि कधीं नाही ती

[ पान १२८वर चालू ]



# कुत्रा शास्त्रज्ञ आणि मी

शास्त्रज्ञानीं आपल्या शास्त्रीय ज्ञानानें सिद्ध केलं आहे कीं कुत्रा हा कांहीं बुद्धिमान प्राणी नाहीं. परीक्षा घेतानां त्यांनीं कुत्र्यांना मोठमोठ्या खोल्यांत ठेवलं होतं. त्या खोल्या बंद होत्या पण त्यांना अंगची कुलुपं होतीं—थोडीशी हालचाल होतांच दारं उघडणार होतीं, दोऱ्या होत्या—स्प्रिंग्ज होत्या आणि इतर कितीतरी गोष्टी होत्या. पण कुत्र्यानां त्या कोणत्याच गोष्टीचा उपयोग करून बाहेर पडणं जमेना. उलट तशाच परिस्थितींतील माकडं थोड्याशा परिश्रमानं बाहेर पडलीं... कुत्र्यांच्या बुद्धिमत्तेची आणखी हि निरनिराळ्या तऱ्हेनं परीक्षा घेण्यांत आली आपल्या धन्याचा फोटो ते ओळखूं शकले नाहींत...आलटून पालटून पेटविण्यांत येणाऱ्या तीन निरनिराळ्या दिव्यांपैकीं क्षणार्धापूर्वी कोणता पेटविला होता हेहीं त्यांच्या लक्षांत राहीना—एका विशिष्ट खोलीच्या चार दरवाजाची कडी काढणं—घालणं चालू असतां ते मख्खपणे बसून राहिले......वगैरे वगैरे.

मला वाटतं नेहमीप्रमाणें शास्त्रज्ञानीं इथेंसुद्धां पुष्कळशा गोष्टी विचारांतच घेतलेल्या नाहींत. पहिली म्हणजे, एक कुत्रा 'ढ' निघाला म्हणणे सारेच तसे असतील असं समजणं धाष्टर्याचं आहे. तसंच ज्याला 'हुषारी' म्हणतात, ती हुषारी सुद्धां निरनिराळ्या प्रकारची असूं शकते. शास्त्रज्ञानां दिसते तवढीच फक्त हुषारी-बाकी हुषारीच नाहीं, असं म्हणतां येईल का ? कुत्र्यापेक्षां माकडानीं जास्त हुषारी दाखविली असं वर म्हटलं आहे. मान्य ! पण त्याच्यापुढें जाऊन मी असं विचारतों, रात्रीं तुमच्या गल्लीतनं एखादा परका जाऊं लागला तर माकडं गोंगाट करतील कीं कुत्रा त्याच्या अंगावर भुंकून उडेल !

तीन निरनिराळ्या दिव्यांची गोष्ट वर मोठ्या ऐटीनें सांगितली आहे. त्यावर मी असं म्हणतो कीं तुम्ही कॉलेजांतल्या एखाद्या प्राध्यापकाला हीच गोष्ट करायला लावा आणि मग तुमच्या लक्षांत येईल कीं त्या प्राध्यापकाला कुत्र्यापेक्षां जास्त प्रगति दाखवता नाह.







आतां फोटोविषयीं म्हणाल तर कांहीं कुत्र्यानां सिनेमा पहाणं सुद्धां आवडते (माझा स्वतःचा अनुभव आहे हा) तर कांहींनां सिनेमा मुळींच आवडत नाहीं. (म्हणजेच त्यानां 'चित्रं' स्थिर अगर फिरतीं हीं बरीं आहेत कीं वाईट आहेत हें कळतं असा अर्थ नाहीं का होत!) आणि शिवाय कांहीं कुत्रे असे आहेत कीं ते चित्रांकडे, तीं चित्रं आहेत सत्य नव्हेत हें ओळखून ढुंकूनही पहावयास तयार नसतात.

कुत्र्यांविषयीं अशी कितीतरी माहिती मी सांगूं शकेन. आणि थोडीशी चौकस नजर असेल तर तुम्हीहि सांगूं शकाल. कुत्रा हा बुद्धिमान प्राणी हा शास्त्रीय निष्कर्ष खोटा ठरतोय्.

शास्त्राच्या त्या निष्कर्षाविषयींहि मला फारसं म्हणायचं नाहीं. पण शास्त्रांत एका फार मोठ्या गोष्टीकडे आजपर्यंत दुर्लक्ष केलं आहे. (तिकडे तुमचे लक्ष वेधावं अशी माझी इच्छा आहे) ती गोष्ट म्हणजे **शास्त्रज्ञांची तपासणी** (Test of Scientists) ती तपासणी घेतली तर शास्त्रज्ञ हें वानरांपेक्षां कमी बुद्धिमान आहेत हें सिद्ध होईल.

खालील तपासणीचे रिपोर्ट काय सांगतात पहा—

(१) एका घनदाट अरण्यांत काळोख्यारात्रीं, अरण्याच्या मध्यभागीं दहा शास्त्रज्ञांना नेऊन ठेवलं. कां तें सांगितलं नाहीं. आणि तपासणींत असं आढळून आलं कीं तें घाबरलेले होते—गोंधळलेले होते—पुढें काय करावं तें कळेनासे झालेले होते. कोणी वाटोळे वाटोळे धावूं लागले. कोणी चौकोनो धावा काढीत होते—तर कुणी वाकडे तिकडे धावत होते. पण कुणीहि जंगलच्या बाहेर येऊं शकला नाहीं. उलट दहा डुकरं तशींच ठेवलीं तेव्हां तीं थोड्याच वेळांत जंगलच्या बाहेर सुरक्षितपणें आलेलीं आढळून आलें.

(२) अठरा शास्त्रज्ञानां घाईघाईनें कपडे करावयास सांगितलें. (जो लवकर व व्यवस्थित कपडे करील त्यास बक्षीस ठेवलें होतें) तेव्हां एकजण आपला चष्मा लावण्यास विसरला, दुसऱ्याचा चष्मा डोळ्यावर होता तरीही तो चष्माच शोधीत होता, आणि तिसरा एकजण आपण कपडे करीत आहोंत हें मध्येंच विसरून अर्धे केलेले कपडे त्यानें काढून टाकले व सरळ बिछान्यावर जाऊन झोपला.

(३) नऊ शास्त्रज्ञानां एका बंद खोलींत ठेवलं होतं. त्यांतील खुर्च्या क्षणाक्षणाला मोडत होत्या, भितीवरील तसबिरी कोसळत होत्या, दरवाजे आपोआप उघडत होते, बंद होत होते. दिवे विझत होत येत होते—विझत होते-येत होते—खालची जमीन हादरत होती. वरची तक्तपोशी हळूहळू खाली येत होती...त्या नऊ जणांपैकीं दोघेजण खिडकींतून पळाले. (आम्ही खिडक्या बंद करावयास विसरलों होतों.) दुसरे दोघे बेशुद्ध पडले, तिघेजण एका टेबलापाशी बसून भाषण करण्याच्या तयारींत होते. आणि उरलेल्या दोघांनीं मोठ्यानें (आम्हां बाहेरच्या लोकांस) विचारलं, 'यावेळीं आम्हीं कसं वागावं अशी तुमची इच्छा आहे?'

(४) तीन शास्त्रज्ञांनी एक चित्र दाखवून त्यावर मत विचारलं तेव्हां एकजण म्हणाला, 'चित्र फार सुंदर आहे,' दुसरा म्हणाला, 'चित्र फार खराब आहे,' व तिसरा म्हणाला कीं, 'चित्राच्या कागदाचा वास फार सुखकारक आहे.'

[पान ११ वरून चालू]

बायला आंतच भीति वाटूं लागली होती. बरं न् वाईट सगळं कांही सुचूं लागलं होतं. जग काय म्हणेल याची खंत करावीसं वाटूं लागलं होतं. गांवाचे हजार डोळे सर्वत्र फिरतांना सतत दिसूं लागले होते.

आणि ज्याला अनुभव आहे त्याला पटलंच पाहिजे कीं ही परिस्थिति बरी नाहीं...

मीं आत्यंतिक बनत चाललों होतों, हेंच खरं, तसं नसतं तर... म्हणजे रेशन आणण्यासाठीं चावडीवर त्या दिवशीं कांहीं मी प्रथमच गेलों नव्हतों. किंवा आंबट चेहऱ्यानं मला कोरडा उपदेश करण्याची जगन्नाथ पुराणिकाचीसुद्धां ती पहिलीच खेप नव्हती.

---

(५) एका प्रथितयश शास्त्रज्ञाला त्याची मोटार गाडी चालू करण्यास सांगितले. तेव्हां त्यानें गेल्या आठवड्यांत पाहिलेल्या सिनेमाचं कथानक सांगण्यास सुरवात केली. तीन वेळां त्यास गाडी चालविण्यास सांगितली व तिन्ही वेळां त्यानें गाडी सुरूं करण्याऐवजीं इतर गोष्टी सुरूं केल्या. उलट सामान्य ड्रायव्हरनां हीच गोष्ट सांगितली तेव्हां ते त्या परीक्षेंत १०० टक्के यशस्वी झाले.

(६) एका शास्त्रज्ञाला त्यानें कधींहि न मागविलेल्या व त्याला कधींहि न पाठविल्या गेलेल्या सामानाचं बिल पाठविलं. त्यानं ते पैसे चेकनं पाठविले. तेव्हां त्याला त्याची पावती पाठविण्यांत आली. पावतीवरील आंकडा पाहतांच हें कसलं तरी बिल समजून त्यानं ते परत भरलं, तेव्हां त्याचा दुसरा चेक व सोबत माफीचं पत्र त्याला पाठविलं. तेव्हां त्या सद्गृहस्थानें तिसरा चेक (दुसऱ्या बॅंकेचा) व माफीचं पत्र पाठविलं. दुसऱ्या बॅंकेंत पुरेसे पैसे नसल्यामुळें तो चेक परत आला.

(७) दहा शास्त्रज्ञांकडे वीस कुत्रे देऊन त्यांना कुत्र्यांची परीक्षा घेऊ (१) कुत्रे हुषार आहेत. (२) कुत्रे हुषार नाहींत यापैकीं कांहीं तरी सिद्ध करावयास सांगितले. निकाल पाहिला,

तेव्हां तिघां शास्त्रज्ञांचे कुत्रेच हरवले होते, दुसऱ्या तिघांना कुत्रे चावले आणि उरलेले चौघेजण आपसांत भांडूं लागले आणि त्यांच्या भांडणाची टिपणं ते कुत्रे घेत होते.

(८) तिघां शास्त्रज्ञांना एक मजेदार गोष्ट सांगण्यांत आली. तेव्हां एकजण म्हणाला कीं ती गोष्ट मजेदार नव्हती, दुसऱ्याने ती गोष्टच ऐकली नव्हती. तिसरा हंसला पण लगेच त्यानें माफी मागितली. उलट तिघा माकडानां तीच गोष्ट सांगितली तेव्हां ते खदखदून हसले.

(९) एका सुप्रसिद्ध शास्त्रज्ञाला एका झोपडींत ठेवलं. तिचे दरवाजे फार ठेंगू होते. खालीं वाकून बाहेर यावं ही गोष्ट अनुभवाने शिकण्यास तयार नसलेला तो शास्त्रज्ञ तीन वर्षं दरवाजावर डोकं आपटीत होता. पण त्याचवेळीं त्यांचा कुत्रा आनंदानें खालीं वांकून बाहेर जात येत होता.

(१०) एक फार मजेदार प्रश्न पंधरा शास्त्रज्ञांना विचारण्यांत आला. पण त्या पंधरापैकीं कुणींहि त्याचं उत्तर देऊं शकला नाहीं. (व मी काय प्रश्न विचारले होते ते माझे मलाहि माहीत नाहींत.)

वरील सर्व प्रश्नांवरून व त्याच्या निष्कर्षांवरून काय सिद्ध होतं?

(आधारीत) —श्रीकृष्ण ठाकूर





पोलीस पाटलाला डोळा घालत जगन्नाथानं नेहमींप्रमाणंच म्हटलं होतं, "तुझ्या तात्याला हें कळायला हवं. नदू—अरे, तुझ्यासारख्याला बायकोबरोबर पाठवणं योग्य नाहीं."

"कां ? त्याला काय होतं ?"

"ती काय सरळ बाई आहे ? कोणीहि असं चावडीवर उभं रहावं. कोटाचा खिसा नुसता वाजवावा आणि बघावं या बायकडे काय ? पाकीट काढायचीहि गरज नाहीं."

जगन्नाथ पुराणिक इकडे सांगत होता मला. पण त्याची नजर होती रेशनच्या दुकानांत—बायकडे. तिकडे बाय धान्य मापत असलेल्या नोकराशीं हुज्जत घालीत होती. कमरेवर दोन्ही हात. पदराकडे तिचं लक्ष नव्हतं. पुराणिकाची आशाळभूत नजर तिकडेच खिळून होती.

तेव्हांच राग आला मला त्याचा. मी म्हटलं, "काय कळायचं तें कळलं. आभारी आहे."

आणि तरीही तो शिष्टासारखा हंसला. म्हणाला, "रागावलास तरी हरकत नाहीं."

"मी कशाला रागवूं ? माझी थोडीच बदनामी करतोयस तूं ? जिची करतोयस तिनं रागवावं हवं तर."

"तिची रे काय फिशाद ?"

"खरं आहे. तिची फिशाद नाहीं. आणि म्हणूनच थोबाड शाबूद आहे तुझं अजून."

"अरे जारे ! कोण समजलास मला तूं."

"सांगूं ?" आणि पोलीस पाटलाच्या समोर त्याला सांगून टाकलं, "पाठ आहेसं बघून चावा घ्यायची संवय असते कुत्र्यांना. तूं कुत्रा नाहींस. तेव्हां ही संवय टाकायला हरकत नाहीं तुला."

तोंडावर सांगितलं आहे तिला. सांगूनच टाकलं आहे, काय तशी अडचण झाली तर आधीं माझ्याकडे ये. गांवठी इलाज करीत बसशील आणि कठिण झालं कीं धांवशील पुराणिकाकडे. मग मात्र तुझी केस हातांत घेणार नाहीं." जगन्नाथ पुराणिक अवसानानं म्हणाला. भिक्षुकी करून भागत नव्हतं म्हणून जोडीला वैद्यकी करीत होता हा पुराणिक. सुई टोंचण्याचं शास्त्रही शिकून आला होता. त्याच्या घरच्या ओटीवर 'रजिस्टर्ड प्रॅक्टिशनर'ची पाटी होती. आमच्या गांवढ्या गांवांत पाटी लावून वैद्यकी करणारा तो एकटाच 'डॉक्टर' निघाला होता. आणि म्हणूनच आजकाल गांवांत आपल्याला वजन आहे असा त्याचा समज झाला होता.

"मग आली कीं नाहीं ती तुझ्याकडे ?" न राहून मी विचारलं.

"अजून तरी नाहीं."

"म्हणजे तुझ्यापेक्षां गांवठी औषधांवर विश्वास दिसतो तिचा. वाईट गोष्ट. तुझ्या धंद्याची प्रतिष्ठा अशानं टिकणार नाहीं."

उघड उघड चेष्टा लावली होती मी पुराणिकाची. पोलीस पाटील देखील हंसूं लागला.

"तुझ्याशीं बोललों हीच चूक"—जगन्नाथ चिडून म्हणाला.

"जगन्नाथ, चुका केल्याशिवाय माणूस मोठा होत नाहीं. आणि तुला तर त्या खूपच कराव्या लागतील. म्हणजे मोठा व्हायचं असेल तर."

"सांगितलं ना मी गाढव आहे म्हणून." पुराणिकानं कबुली दिली.

आणि तितक्यांत रेशनचं बिल चुकतं करण्यासाठीं बायनं मला साद घातली.

वास्तविक तो विषय तिथंच थांबायला हवा होता. पण जगन्नाथ पुराणिकाची अस्मिता दुखवली गेली होती, आणि अहंकाराचा सुरवंट आंतल्याआंत वळवळूं लागला होता. म्हणूनच तो माझ्यामागं रेशनच्या दुकानांत आला. गुरगुरत बायला त्यानं म्हटलं, "बाय, तुझ्या या छोट्या धन्याला चारचौघांत माणसासारखं बोलायला शिकव जरा."

"अर पुराणिका, प्वार हाय त्यो." बायनं सांगितलं, "माज्यासंग येयाची तयार नाय त्यो. म्हुणला जा तूं एकटीच. तर आतां तूंच सांग ह्येला प्वार म्हुनायचा कीं मोठा ?"

बाय खदखदून हंसूं लागली. जगन्नाथ पुराणिक निमूक खुलला. आणि तसा माझ्या अंगांत सैतान शिरला. मी उचंबळून म्हटलं, "अग बाय, हा पुराणिक डॉक्टर गाढव आहे.

जगन्नाथ पुराणिक भलताच बिथरला. संतापानं थरथरत ओरडला, "नंद्या, शरम नाहीं वाटत ?"

"शरम वाटायला गांवाचे उकिरडे फुंकत फिरत नाहीं मी." माझी तयारी होतीच.

तसा तो आणखीच उखडला, "उकीरडे फुंकतोस तूं...तूं या बायला बरोबर घेऊन."

"मुकाट्यानं शब्द मागं घे." मी थंडपणं त्याला बजावलं.

"नाहीं घेत. काय करणार आहेस ?"

"काय करणार—" झटक्यानं पायांतली चप्पल काढून मी हातांत घेतली. मानगूट धरून जगन्नाथाला जवळ खेंचलं. थडाथड दोन खेटरं हाणलीं त्याच्या तोंडावर आणि मग म्हटलं, "शब्द मागं घे."












पुराणिकानं ओरड मारली. पोलीसपाटलाच्या नांवानं चोंच ठोकली. माझ्या हातून सुटण्यासाठीं धडपडूं लागला. पण माझी पकड पक्की. आणि त्याला सोडायला मी तयार नव्हतों.

रांगा टाकून लोकं आमच्या भोवतीं गोळा झाली. पोलीस पाटील हरातरा धांवत आला. हुकमी आवाजांत कांगावा करूं लागला, "प्वारा सोड त्येला. अर, चावडीम्होरं ह्यो काय तमाशा ?"

मी म्हटल, "सोडीन. पण तो शब्द माग घेईल तेव्हां."

माझं एकंदर अवसान बघून त्यानंहा–पाटलानं-माझा नाद तेव्हांच सोडला. तो [illegible] पुराणिकाला बाबापुता करू लागला. दमदाटी करूं लागला, "डाक्तुरा, शब्द माग घे-माग घे."

आणि आतां कुठं बायचा आवाज मला ऐकूं येऊं लागला. म्हणजे जवळ, माझ्याजवळच तर होती तो. तिच्या समोरच बग्याचं मानगूट पण नाहीं. बाय जवळपास नव्हती. सभोवतीच्या घोळक्यात पण नव्हती. "हटा–बाजूला हटा रं" असं ओरडत आणि दोन्ही हातांनीं लोकांना बाजूला हुसकून येताना तिला मी पाहिलं आणि बघतच राहिलों.

"सोड त्येला." तिनं हुकूम केला. आणि ती माझ्या हाताला झोंबली.

"तूं मधीं पडूं नकोस." मी म्हटलं.

"मध्यं नाय. पाया पडतें तुझ्या. सोड त्येला."

"त्यानं तुजी क्षमा मागितली पाहिजे."

"तो माजी क्षेमा मागल. नायतर मी त्येची मागन. तें आमचं आमी बगूं. आधीं तूं त्येला सोड."

"पण—"

"सोड. माजं ऐक नंदू."

"जा रे!" पुराणिकाला मी त्वेषानं लोटून दिलं. बाजूला ओटकड्यावर जाऊन तो आदळला. आणि तसं त्याला मी बजावलं, 'याद राख. फिरून माझं नांव घेतलंस, तर मात्र तुला कोणी सोडवूं शकणार नाहीं."

"लई पराक्रम केलास. चल आतां" बायनं दटावलं.

"अनौजी माणूस आहे तो. ओळखत नाहींस तूं" आजूबाजूच्या सगळ्या लोकांना ऐकूं जावं एवढ्या मोठ्या आवाजांत मी सांगू लागलों.

पण बायनं मला अर्ध्यावरच तोडला, "तूं कायबी नग बोलूं. त्येला बाय आजचं वळखत नाय."

तिनं धान्याचं ओझं उचललं अन् मला पुढं करून चावडीवरून एकदाचा पाय काढला.

वाटेंत बायला मी म्हटलं, "सुरवातीलाच अडवलं नाहींस मला ?"

"कोणी तरी माराया हवंच व्हतं त्याला. भारी माजला व्हता."

"पण, तर पळून गेलीस."

"हें गाच हायस! तुमची मारामारी बगत व्हायेनं व्हय मी ? अन् मंग ताऱ्यांस्नी कार्य सांगणार व्हतं रे ?"

"आतां काय सांगणार आहेस ?"

"सांगनार, मस कायबी ठाऊक नाही. समजल तशी धांवत येऊन ह्या नंदूल्या बाजूस केलं. पोलीसपाटलालाबी जमलं नाय."

"खुश दिसतेस."

"हाय. आन् नायबी. बायच्या मनाचे दोन तुकडे झाले हायत. एक हंसतू हाय, दुसरा रडतू हाय."

गहिंवरल्या आवाजांत तिनं सांगितलं. म्हणजे आश्चर्यानं तिच्याकडे मी पाहिलं. तिच्या डोळ्यांत आसूं होतें आणि ओठावर हंसूं होतं.

"माज्याकडे बगू नग नन्दू. रडूं दे मस. रडू दे. रडण्यांतबी सुख असतं. तुज नाय समजनार."

बुधवारला आठवड्याचा बाजार. बाजाराचं गांव आमच्या गांवाहून तरी दोन कोसावर. बाजाराला माझं काम नव्हतं. आणि तरीही सायकल नारबा नागवेकराच्या हॉटेलांत टाकून बाजारांत मी एकटाच भटकत होतों.

बाजार हमरस्त्यावरच या टोंकापासून त्या टोंकापर्यंत दुतर्फा पसरला होता. आज हा गलका आणि हा गजबजाट होता. गर्दी इतकी कीं मुंगीला सुद्धां पाय ठेवायला वाव नव्हता. आणि तरीही एकादं चुकार जनावर गर्दी तुडवीत घुसत होतं. रस्त्यावर भाजी मांडून बसलेल्या बायका काठ्या घेऊन मागं लागत होत्या. तसं जीव घेऊन गुरं धांवत होतं आणि जिवाच्या भयानं लोकं पांगत होतीं. या धादलींत कांहींही होत होतं. कांहीही झालेलं चालत होतं.

आणि अशा या गर्दींत धक्के देत आणि खात मी भटकत होतों. गांवातलं कोणी दिसल तर चुकवत होतों. अगदीं सलगीचाच असला तर हंसल्यासारखं करून पुढं सटकत होतों.

आणि पोलीस पाटलानं मुद्दामहून त्याला हटकलं नसतं तर बायच्या नवऱ्याकडे कांही माझं लक्ष गेलं नसतं.

नाक्यावर तीन पत्त्यांचा डाव मांडून तो बसला होता. हातांनी पानें उडवीत ओरडत होता, "हें एक हिंदुस्थान–तें एक हिंदुस्थान तुमी लावनार, तुमी खानार. रुपायाला दोन, दोनाला चार, पांचाला धा..."

आमच्या गांवच्या पोलीसपाटलाची इथं बाजारच्या गांवांत हुकमत नव्हती. आणि तरीही आपली चांदीच्या मुठीची काठी अधिकारानं उगारत त्या जुगारड्याला त्यानं जरब दिलीच, "आतां उटतूस ? का घालू पाठींत ?"

"व्हय, जातूच नव्हं !" त्यानं तोंड वेंगाडलं. सोन्याचे दांत दाखवले. आणि पत्ते खिशांत टाकून तो उठला.

"आन् काय रं ? सरळच चाललास ?" पोलीसपाटलानं म्हटलं.

"हाय लक्षांत, म्होरल्या बाजाराला नक्की." जुगारड्यानं सांगितलं.

"तूं हें रोजच सांगतूस. आन् मीबी गाडाव इश्वास ठिवतों."

"जरंड्या घाडीवर इश्वास टाकाया हरकत नाय, फौजदार !"

जरंड्या घाडी !—त्याचं नांव मी ऐकलं होतं. खूप कीर्ति होती या माणसाची. विशेष म्हणजे बायचा तो नवरा होता.

"इश्वास ? त्यो मेला पानपती." पोलीसपाटलानं विनोद केला आणि आपला आपणच हंसूं लागला.

"पुन पाटील, तुमाला कं काय काळजी. बायकूला गहाण टाकली हाय मी तुमच्याकडे. कसं ? काडा लिलावांत. ग्वाप पैका मिळल. तसा असली डाग हाय मजा!" जरंड्यानं हंसत म्हटलं आणि थंडपणे विडी शिलगावली.






"आतां काय म्हुनायचं तुज जरंड्या ?" पोलीसपाटील ओरडला आणि खो: खो: हंसतच सुटला, "पुराणिक डाक्तुरां, अर ऽ ऐकलंय...नाय वाटतं त्यो..."

त्यांचं पुढचं संभाषण ऐकायला मी थांबलों नाहीं. तें अधिक गलिच्छ होण्यापूर्वींच तिथनं सटकलों. लग्न करूनही रंडकी होती बाय. तिच्या कपाळींचं कुंकू फुकट होतं. त्याला अर्थ नव्हता.

राहून राहून मला आश्चर्य वाटत होतं! बायचा पत्ता काय? गर्दीत कोणाचंहि लक्ष तिच्याकडे गेलं असतं आणि मी तर केवळ तिच्यासाठीं बाजारांत चकरा मारीत होतों.

गांवदेवीच्या देवळांत नौबतीवर काठी पडली. आणि तसा सायकलवरून मी रस्त्याला लागलों...

उतारावर सायकलचं पॅडल आपोआप गरगरत होतं. आणि माझी सावली माझ्याभोंवती घोटाळत होती.

केळशाऱ्याच्या डोंगरावर मर्तीच्या कुंभापाशीं बाय माझी वाट पहात होती. एकटीच. आणि अशा दुपारला. एकच विचार. तो—तेवढाच.

बायला मी दुरूनच पाहिलं. आणि पाहून ओळखलं ती आपल्याच नादांत चालली होती. आजूबाजूला लक्ष नव्हतं.

मागं सायकलचा आवाज ऐकला. आणि तशी बाय जागच्याजागीं थांबली. पण त्यापूर्वींच माझा हात तिच्या खांद्यावर पडला होता.

"तूं! काढ हात." तिनं दटावलं.

"आतां कां?" मी म्हणालों.

"अर ऽ रस्ता हाय लोकं येत्यात—जात्यात."

"लोकांचं कौतुक पुरे. चढ वर." मी तिला सांगितलं.

"आं!"

"पुढं बैस कीं इथं."

"पडन मी."

"पडशील कशाला."

बळंच बायला सायकलवर मी पुढं घेतलं. सायकल चालवूं लागलों.

"मर्तीच्या कुंभावर नेऊन सोडतों तुला." मी म्हटलं आणि तिच्या डोक्यावर हनुवटी टेकली. तेव्हां कबुतरासारखी मान मोडत तिनं माझ्या डोळ्यांत डोकावलं आणि विद्ध स्वरांत विचारलं, "आन् तूं कुट जातूस?"

"तूं तिथं मी."

मी बायला तिच्या नवऱ्याची हकीकत सांगितली तेव्हां ती चिडली नाहीं. वाईट सुद्धां वाटलं नाहीं तिला. उलट हंसून म्हणाली, "राक्षस हाय मेला. बाजारला त्यो हाय असं कललं आन् तशी मी मागारीच फिरलें."

"तरीच दिसली नाहींस."

बाय कांहींच बोलली नाहीं. तिनं आपली मान माझ्या खांद्यावर टेकला. त्यासरशीं सहसंवेदनेची उनऊनीत लाट दोघांनाही धडक देऊन गेली. तशी बाय मला अधिकच बिलगली. तिच्या केसांचा मातट वास माझ्या नाकांत भरभरून राहिला.

आणि मग सायकेलवर बसलों ध्यानींत हें दोघांच्या लक्षांत राहिलं नाहीं. रस्ता सोडून सायकल बाजूला झुडुपांत घुसली. आणि आम्ही खालीं कोसळलों.

लागलं नव्हतं. आणि तरीही बाय तशीच पडून राहिली. मला-सुद्धां उठूं देईना...तिच्या हिरव्या साडीचा लालभडक पदर जागचा ढळला होता. लालचुटुक ओठ नकळे दाटले होते. डोळ्यांनी नुसतीच उघडमीट चालली होती. तें क्षणाक्षणाचें आव्हान...क्षणाक्षणाचें आवाहन!—

"बामणाच्या पोरा, अर इचारच करावा तूं."

तो आवाज...माझा नव्हता. बायचा पण नव्हता. त्या उन्मनस्क मनःस्थितींत सुद्धां ओळखलं मी. आणि तसा दोडकून उठून उभा राहिलों.

होय. माझा संशय बरोबर होता. बायचा नवरा जरंड्या घाडी माझ्यासमोर उभा होता. एकटा नाहीं. तरी दहावरा इसम त्याच्या-बरोबर होते.

एकाचंही लक्ष माझ्याकडे नव्हतं. बायकडेच बघत होते सारे. उपाशी नजरेनं. अघाशी वासनेनं.

"गड्यानू, माझी बायकू ही." जरंड्यानं पावलून माहिती दिली. आणि त्याचे सोंगडी चवांत वेडूक अडकल्यागत गदगदां हंसले.

एव्हांना माझ्यांतील ताऱ्या नडकर्ण्याचा पोर शुद्धीवर आला होता. भारी चलाख अन् धोरणी ही बामणांची औलाद. अन् तशीच चपळ सुद्धां.

उगाच नाहीं. बाजूला पडलेली सायकल मी कशी उचलली, तिच्यावर कधीं चढलों आणि त्या सगळ्यांचा डोळा चुकवून केव्हां न् कसा पसार झालों माझं मलाच कळलं नाहीं......

संध्याकाळपर्यंत गांवांत बातमी झाली.

(पान ४६ वर चालू)



डॉक्टर अलिकडे माझ्या पाठींत टाचण्या टोचल्यासारखे दुखतय् बरं




*इतिहास या विषयांत लंडन विद्यापिठाची डॉक्टरेट मिळवून संशोधन कार्यास वाहून घेणारे डॉ. पु. म. जोशी यांच्यासारखे विद्वान फार थोडे. यांच्या या कर्तबगारीमुळेंच सरकारनें त्यांची डायरेक्टर ऑफ अर्कालॉजी या उच्चपदीं नेमणूक केली. जुन्या सुरतेसंबंधी त्यांनीं सांगितलेली ही मनोरंजक माहिती—*

डॉ. पु. म. जोशी

इसवी सनाच्या सोळाव्या शतकाच्या आधीं इतिहासांत सुरत शहराचा उल्लेख अगदी तुरळक आढळतो. सोळाव्या व सतराव्या शतकांत जगाची बाजारपेठ म्हणून ज्या सुरत शहराचं नांव महशूर झालं, त्याच्या व्यापारी भरभराटीची सुरवात सोळाव्या शतकाच्या सुरवातीच्या आसपास, पंधराव्या शतकाच्या शेवटच्या दशकापासून झाली असंच इतिहास आपल्याला सांगतो. इसवी सन १५१५ मधं बार्बोसा नांवाचा पोर्तुगीज प्रवासी सुरतला आला होता. तो आपल्या प्रवासवर्णनांत लिहितो. कीं सुरतेला व्यापारी उलाढाल बरीच होते. इथं मलबारच्या व इतर बंदरांतून व्यापाराकरितां दर वर्षी बरीच जहाज येतात. इथले व्यापारी हिंदू व मुसलमान चांगलेच सधन आहेत आणि इथं आयात होणाऱ्या व्यापारी मालाच्या जकातीचं चांगलं भरभक्कम उत्पन्न गुजरातच्या सुलतानाला मिळतं. आजपर्यंत या शहरांत मलिक गोपी या धनाढ्य हिंदू सरदाराचं वर्चस्व होतं व हा मलिक गोपी पोर्तुगीजांचा चाहता दोस्त होता. कांही दिवसांपूर्वी सुल्तानाची त्याच्यावर इतराजी होऊन तो प्राणास मुकला.

सुरत शहराच्या ऐश्वर्याचा पाया मलिक गोपीनंच घातला. पोर्तुगीजांशी असलेल्या त्याच्या मैत्रीमुळेंच पोर्तुगीजांच्या दृष्टीस या बंदराचं व शहराचं व्यापारी महत्त्व पटलं व पुढं मागं हें बंदर आपल्या व्यापाराला चांगलंच उपयोगी पडेल, हें धोरण त्यांनीं मनांत ठेवलं. मलिक गोपीचं नांव आज सुद्धां सुरत शहराची माहिती असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या समोर आहे. गोपीतलाव, गोपीपुरा हे जे आज सुरत शहराचे भाग आहेत ते मलिक गोपीच्या कारकीर्दीशी निगडित आहेत. मलिक गोपीचा राहण्याचा वाडा आजच्या गोपीपुरा भागांतच असावा. अर्थात् आज त्याचा मागमूसही नाहीं. त्याचप्रमाणं गोपीतलाव हे नांव जरी आज सुरतेच्या नागरिकांच्या तोंडी नेहमीं येतं तरी ते आपल्या मुंबईच्या धोबीतलावासारखंच, म्हणजे शहराचा एक भाग म्हणून, तलाव म्हणून नव्हे. इ. स. १५०० च्या सुमारास हा भव्य तलाव तयार केला गेला असावा. त्याचं क्षेत्रफळ ५८ एकर होतं व तलावाच्या मध्यभागीं एक जलमंदिर असून, सुरतेचे नागरिक जलविहार करून चार घटका या जलमंदिरांत मजेनं घालवीत असत. या तलावाचा आकार सोळा कोनी असून, तलावांत उतरण्यास सर्व बाजूंनीं घाट होते. इ. स. १६७५ मध्यें डॉक्टर फ्रायर नांवाचा इंग्रज प्रवासी सुरतेस आला होता व तो तलाव जवळ जवळ कोरडा होता असं लिहितो. पण दिवाळीच्या सणांत तलावाच्या घाटांवर व कांठांवर असंख्य पणत्या मंद प्रकाशांत तेवत्या पाहून डॉक्टर फ्रायर अगदीं मुग्ध होऊन गेला. इतकं सुंदर दृश्य पाहून आपले अगदीं डोळे निवले असं तो सांगतो. मलिक गोपीप्रमाणंच त्याची पत्नी, हिचंही नांव सुरतेच्या इतिहासाशी निगडित झालेलं आहे. आजची राणी चकला ही वस्ती व राणी तलाव हें नांव या गोष्टीची साक्ष देत आहेत.

सुरत शहर तापी नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर वसलेलं आहे व उत्तर किनाऱ्यावर रांदेर हे गांव आहे. सोळाव्या शतकाच्या सुरवातीला रांदेर हे चांगलं भरभराटीस आलेलं व्यापारी शहर होतं व सुरतेपेक्षांही जास्त समृद्ध. पोर्तुगीजांची नजर या दोन्हीं शहरांकडे १५३० च्या सुमारास पुन्हां एकदां वळली. शनीची वक्र दृष्टिच ती, आणि गुजरात किनाऱ्यावर फिरणाऱ्या एका पोर्तुगीज काफल्यानं अगदीं कांहीं कारण नसतां रांदेर व सुरत या दोन्हीं शहरांवर हल्ला करून रांदेर तर अगदीं बेचिराख करून टाकलं. असे हल्ले पुन्हां होऊं नयेत व झाले तर त्यांपासून नीट बचाव करतां यावा म्हणून गुजरातचे सुलतान यांनीं सुरत प्रांताचा सुभेदार ख्वाजा सफर सलेमानी याला हुकूम केला व या ख्वाजा सफरनं १५४० मध आज जो आपल्याला तापी नदीवर सुरतेचा किल्ला दिसतो त्याचा पाया घातला व १५४६ मध किल्ला बांधून तयार केला. या काळापासूनच रांदेर व सुरत या दोन्हीं शहरांचा व्यापार सुरतेहून होऊं लागला. या किल्ल्यावर चांगल्या लांब पल्ल्याच्या तोफा ठेवल्यामुळं सुरत शहर व बंदर आतां निर्वेध व सुरक्षित झालं आणि त्याचं व्यापारी महत्त्व व भरभराट उत्तरोत्तर वाढीस लागली. १५७२-७३ मधं गुजरातच्या स्वतंत्र राज्याचा अस्त होऊन गुजरात मुघल साम्राज्याचा प्रांत झाल्यानंतर सुरत बंदर ओघानंच मुघल साम्राज्याचं बंदर झालं. खंबायतचं बंदर हळू हळूं गाळ साचत गेल्यामुळं मोठ्या जहाजांना वापरतां येणं कठिण झालं आणि हे सुरत बंदर त्यांना जास्त सोइस्कर वाटूं लागलं. अर्थात् सुरतेचा आंतरदेशीय व्यापारहि वाढूं लागला. मुघल साम्राज्यांतून मक्का शरीफच्या यात्रेला जाणारे लोक बव्हंशी








सुरत बंदरांतूनच आपल्या हाजची सुरवात करीत असत. यात्रेच्या मोसमांत सुरत बंदर मक्का मदीनेला जाणाऱ्या यात्रेकरूंनीं अगदी गजबजून गेलेलं असे. आणि म्हणूनच सुरतेला बंदर मुबारक—भाग्यदायी, शुभदायक बंदर.किंवा बाब अल् मक्का, बाब अल् हज म्हणजे मक्केचा दरवाजा, यात्रेचा दरवाजा अशीं नांवं मुघल अंमदानींत दिली गेली.

सोळाव्या शतकांत सुरतेला पोर्तुगीजांचीं जंहाजं नेहमी दिसतच; पण या शिवाय जिद्दा, मोका या लाल समुद्रांतील बंदरांतून येणारीं होरमझ, ओमान, बसरा इथली इराणी आखातांतल्या बंदरांतून येणारीं, सोफाला, मालिंदी, मोंबासा या पूर्व आफ्रिकेंतल्या बंदरांतून येणारीं अनेक जहाजं इथं गर्दी करून असत. आणखी चौल, दाभोळ या दक्षिणेतील सुलतानांच्या बंदरांची व मलबार किनाऱ्यावरील कालिकत, कोचीन इथल्या जहाजांची पण सुरतेला ये जा असे. आणि या सर्वांबरोबर सुरतच्या व्यापाऱ्यांचीं जहाजं असत तीं निराळीच. सीलोन, जावा-सुमात्रा या पूर्वेकडच्या देशांहूनही व्यापाराच्या निमित्तानं जहाजं इथं येत असत. या सर्व व्यापारी जहाजांच्या मेळाव्यांत सतराव्या शतकांत प्रथम इंग्रज आले, त्यांच्या मागोमाग वलंदेज म्हणजे डच आले व नंतर कांहीं वर्षांनी फ्रेंच आले सतराव्या शतकांत सुरतेच्या व्यापारी अडत्यांना थोडं पोर्तुगीज, बरचसं फारशी, कांहीं इंग्रजी, थोडंसं फ्रेंच आणि कदाचित् डच इतक्या भाषा अवगत असत असं अनुमान करायला कांहीं हरकत नाहीं. सुरतेच्या Indian English चा एक गमतीदार नमुना ओव्हिंगटन आपल्या प्रवासवर्णनांत देतो. लग्नपद्धतीबद्दल बोलतांना एक गुजराती व्यापारी इंग्रज व्यापाऱ्याला सांगतो. " English fashion, Sab, best fashion have, one wife best for one husband. " (यांच्या आधी सात वर्षं म्हणजे १६२० च्या सुमारास पाद्री टेरी सांगतो. सुरतेचे लोक ख्रिश्चन लोकांना तुच्छ लेखतात आणि मग तो एक व्यापारी त्याच्याशीं इंग्रजींत या विषयावर कसं बोलला ते ऐकवतो. " Christian religion, bad religion, Christian much drunk, Christian much do wrong, much beat, much abuse others. "

सुरतेहून देशोदेशीं निर्यात होणारा मुख्य माल म्हणजे तऱ्हेतऱ्हेचं कापड. सतराव्या शतकांत खंबायतचा व्यापार सुरतेकडे वळूं लागला होता. म्हणजे खंबायतहून ज्याप्रमाणं इराण, अरबस्तान, पूर्व आफ्रिका, मलबार किनारा, सिलोन, मलाया, जावा-सुमात्रा, सयाम इकडे तऱ्हेतऱ्हेचे कापड जात असे त्याचप्रमाणं आतां ते सुरत बंदरांतून जाऊं लागलं. सतराव्या शतकाच्या सुरवातीला इंग्रज ईस्ट इंडिया कंपनीचीं जहाजं प्रथम सुरतेस लागलीं व इंग्रज व्यापाऱ्यांनी मुघल बादशहाकडं संधान बांधून त्यांनीं सुरतेस व सुरतेहून व्यापार करण्याच्या सवलती मिळवल्या व आपलं बस्तान इथं चांगलंच बसवून स्थिरस्थावर केलं.. तापी नदी समुद्राला मिळते तिथं नदीच्या मुखाशीं सुवाली म्हणून एक खेडं होतं. त्याचा किनारा निगऱ्याचा होता. हीच जागा इंग्रज कंपनीनं आपलीं जहाजं नांगरण्याकरतां मुक्रर केलीं. सुरतेस कंपनीनं एक फॅक्टरी किंवा वखार काढून तिथं कंपनीच्या सर्व व्यापारी उलाढालींचं केन्द्र ठेवलं. आतां सुरत शहरांत अनेक व्यापाऱ्यांच्या वखारी दिसूं लागल्या. इंग्रज ईस्ट इंडिया कंपनीनं भडोच, बडोदे, खंबायत अहमदाबाद इत्यादि ठिकाणीं आपल्या वखारी उघडल्या. या वखारींचा कारभार सुरतेहूनच होत असे आणि ठिकठिकाणाहून विकत घेतलेलं कापड, नीळ व इतर माल या वखारींकडून सुरतेला पाठविला जाई व सुरतेहून तो निर्यात होत असे. १६१९ मधील इंग्रज कंपनीच्या पत्रव्यवहारांतील एकच उल्लेख देतो. फक्त एकाच जहाजावर सुरते-



अनुक्रमणिका






हून तीन लाख रुपयांचा माल चढवला गेला (तेव्हांचा रुपया आजच्या कमीत कमी १५ रुपयाबरोबर होता ही गोष्ट लक्षांत ठेवा). दर वर्षी कमीत कमी अशीं १० जहाजं इंग्रज ईस्ट इंडिया कंपनी सुरतेहून रवाना करीत असे. शिवाय पोर्तुगीज, डच, फ्रेंच या युरोपियन व्यापारी राष्ट्रांची जहाजं असतच. आणि आर्मेनियन, अरब व हिंदुस्थानचे व्यापारी यांचीं जहाजं निराळींच व त्यांच्या जोडीला मलाया, जावा-सुमात्रा, सीलोन, क्वचित् प्रसंगी चीन इत्यादि देशांची व्यापारी जहाजंही जमेस धरली पाहिजेत. म्हणजे किती अवाढव्य या सुरत शहर व बंदरचा व्यापार असेल याची कल्पनाच करा. सतराव्या शतकांत सुरत नगरी अगदीं ऐश्वर्यानं ओसंडत होती, तिला सुवर्णपुरी असं नांव पडल्यास काय नवल! अगदीं सोन्याचा धूर निघत असे इथं. आणि या श्रीमंतीमुळंच शिवाजी महाराजांचं लक्ष सुरतेकडे वळलं व मोघल साम्राज्याचं हें धनाढ्य नगर त्यांनीं दोनदां लुटून अलोट संपत्ति ते इथून घेऊन गेले. अशी धाड परत येऊं नये व आल्यास शहराचं रक्षण नीट व्हावं म्हणूनच शहराच्या भोंवतीं तटबंदीची भित चौफेर बांधण्यांत आली. सुरत बंदरांत आयात होणाऱ्या मालांत टिन, पारा, मोती, खजूर, घोडे, गुलाब-पाणी, जाळीची चिलखतं व चिनी मातीची तऱ्हेतऱ्हेची भांडी, बशा, पेले इत्यादि गोष्टी असत. याशिवाय अरबस्तानांतून कॉफी व चीनहून चहा येत असावा असं दिसतं. कांहीं चहा सुरतेहून इंग्लंडला पाठविला जात असे. १६९० च्या सुमारास डॉ. ऑव्हिंगटन लिहितो. सुरतेचे मुसलमान उघड रीत्या मद्य पीत नाहींत. पण खाजगी बैठकींत आमच्या बरोबरीनं घेतात. खाण्यांत ते फार चोखंदळ. सुंदर पुलाव, मटनाचे व इतर मांसाचे म्हणजे कोंबडी वगैरेचे अनेक प्रकार व तऱ्हेतऱ्हेचे हलवे व मिठाया त्यांच्या आहारांत असतात. त्यांच्या उलट हिंदू व्यापारी व इतर लोक अगदीं शाकाहारी. पोळी, भात, भाज्या, दूध, तूप हेच त्यांचं मुख्य अन्न. मद्याला तर ते चुकूनही शिवणार नाहींत. पण चहा कॉफी पिण्याची त्यांना चटक फार आणि त्यांचा चहा मोठा नमुनेदार असतो. अनेक तऱ्हेचे मसाले टाकून तो तयार केला जातो आणि प्रकृतीला तो फार फायदेशीर असतो. म्हणजे काय मसालाची चाय हे जे आपण आज गुजरातचं वैशिष्ट्य समजतों ते साधारण ३०० वर्षांपासून चालत आलेलं आहे. आणि आपल्या गुजरातच्या पार्शी मित्रांचा सर्व प्रवासी मोठ्या कौतुकानं उल्लेख करतात. सुरतेच्या वेढ्याच्या वेळीच सम्राट अकबराची दृष्टि पार्शी समाज व धर्म यांजकडे गेली व त्या धर्माची तत्त्वं नीट समजून घेण्याकरतां म्हणून दस्तुर मेहरजी राणा या पार्शी धर्मगुरुला नवसारीहून सुरतेला बोलावून घेऊन त्याला मोठ्या इतमानानं अकबरानं आपल्या बरोबर दिल्लीस नेलं.

(सुरतेचे मुख्य रस्ते भव्य व प्रशस्त, इमारतीही डौलदार असं सर्व युरोपियन प्रवासी सांगतात. पण इथल्या नागरिकांच्या कांहीं कांहीं सवयी अगदीच घाणेरड्या असा उल्लेख ते करतात. निकोलाओ मनुची नांवाचा एक इटालियन डॉक्टर सुरतेला १६४६ च्या सुमारास उतरला, त्याची तर अगदी गंमतच झाली. बंदरांत उतरल्यानंतर १।२ दिवसांनी तो आपल्या मित्राला सांगूं लागला, अरे मला माझ्या डॉक्टराच्या धंद्यांत इथं रगड पैसा मिळणार. तो कसा काय म्हणून मित्रानं विचारलं तर मनुची म्हणतो, अरे इथं सगळ्या नागरिकांना कसल्या तरी भयंकर रोगानं पछाडलेलं दिसतंय, सगळेजण आपले रस्त्यांत रक्त थुंकतात. हे ऐकून मनुचीचा मित्र अगदीं खो खो हंसूं लागला. अरे निकोलाओ, वेड्या हे लोक रक्त थुंकत नाहींत. पानपट्टी चघळून हे पिंक टाकतात. पानपट्टी खाऊन तोंड लाल होतं आणि हे लोक थुंकल्यावर तुला वाटतं कीं ते रक्त थुंकतात. कां आहे की नाहीं गंमत. या पान खाण्याच्या पद्धतीची, थुंकण्याची नव्हे हं. कांहीं युरोपियन लोकांनी प्रशंसाच केलेली आहे. डॉक्टर फ्रायर म्हणतो. पान हे प्रकृतीला फार हिताचह. आणि १६३० च्या आसपास आलेला मनुचीचा इटालियन देशबांधव पियेत्रो देला व्हाले हा तर म्हणतो कीं बस. आपण इटालीला परत गेल्यावर ही पानपट्टीची पद्धत व शेणानं घर सारवण्याची पद्धत तिथं सुरूं करणार.)

शहराच्या आसमंतांत सुंदर बागबगीचे व शेतीवाड्या असत. त्या पाहून डॉक्टर फ्रायर फार खूष झाला. शहराच्या बाहेर ऊस व तंबाखूची शेतं होती असं तो लिहितो. इथल्या शेतांत सर्वोत्कृष्ट गहूं तयार होतो असही तो सांगतो. भाजीपाल्याचे मळे व फळबागा कशा नयनमनोहर दिसतात. मुळे, गाजरं, टर्निपं, कोबी, अनेक जातीच्या पालेभाज्या, कलिंगडं, मधुर मधुर खरबुजं, तऱ्हेतऱ्हेचीं फळं यांचं पीक इथं अगदीं सपाटून येतं. तांदूळ, गहू, ज्वारी, बाजरी, तीळ व इतर गळितचीं धान्यं, वाल, वाटाणे व तऱ्हेतऱ्हेच्या डाळी इथं समृद्धीनं पिकतात. द्राक्षंहि इथं चांगलीं होतात अशी नोंद फ्रायरनं करून ठेवली आहे.

असं होतं हे सोळाव्या, सतराव्या शतकांतील सुरत शहर व बंदर. पण सतराव्या शतकाच्या अखेरीस इंग्रजांनी आपला व्यापारी कारभार मुंबईस हलवला व मग मुंबईचा उदय व सुरतेच्या व्यापाराचा क्रमशः ऱ्हास हे ओघानंच आलं. या सुरतेच्या आंतर्देशीय महत्त्वाचा, व्यापाराचा व प्रचंड ऐश्वर्याचा जरी लोप झाला असला तरी भारताच्या व्यापारी व आर्थिक इतिहासाचीं पानं सुरतेनं सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवली आहेत ही गोष्ट मात्र सदैव आपल्या नजरेपुढं राहील.

● ● ●



*विपरीताच्या पोटांत शिरून*
*पाहिलें तर कमी अधिक प्रमाणांत*
*तें भयानक, भीषणच असतें.*
*आणि त्याचींच आपल्याला कधीं*
*कधीं इच्छा नसतांनाहिं ओढ वाटते...*



# ओ ढ

— वसुंधरा पटवर्धन

आमचे आपटे मास्तर नेहमीं म्हणायचे, कीं एखादा मनुष्य आपल्या बायकोवर प्रेम करतो, मुलाबाळांचा नीट संभाळ करतो, आपल्या आईवडिलांशीं प्रेमानें वागतो, आपली नोकरी संभाळून व्यवस्थित रहातो आणि कसल्याहि भानगडींत नसतो, असें जर आपल्याला कोणी सांगितलें तर आपल्याला त्यांत विशेष कांहींच वाटत नाहीं. लक्ष देऊन ऐकण्याप्रमाणें त्यांत कांहीं आहे असें आपल्याला मुळींच वाटत नाहीं. आपण एवढेंच म्हणतो कीं, "ठीक आहे." आणि जास्त विचार न करतां आपण दुसऱ्या गोष्टीकडे चटकन् वळतों.

परंतु आपल्याला जर कोणी असें सांगितलें कीं अमका अमका तो मनुष्य तमक्या एका माणसाची बायको घेऊन पळून गेला तर आपण लगेच कान टवकारतो. आपल्याला ही बातमी विशेष महत्त्वाची वाटते. यांत विचार करण्यासारखें पुष्कळ आहे असें आपल्याला ताबडतोब जाणवतें. आणि आपण लगेच त्या चौकशीस लागतों. वास्तविक इतक्या तातडीनें त्याची बातमी मिळवण्याचें आपल्याला कांहींच कारण नसतें. आपल्या तो ओळखीचासुद्धां नसतो. त्याला आपण कधीं पाहिलेलें नसतें. त्याचें नांवसुद्धां आपल्याला प्रथमच समजलेलें असतें. तरीसुद्धां या बातमीची आपल्याला विलक्षण ओढ वाटते. कांहीं कांहीं माणसें तर अशा विषयांत एखादा शब्द समजला, तरी बारा ठिकाणीं हिंडून चौकशी करून येतात आणि मग जें कांहीं त्यांना समजतें तें ऐकून समाधान पावतात. दिवसाकांठीं तास दोन तास त्याविषयीं चर्चा करून स्वतःची उत्तम प्रकारें करमणूक करून घेतात आणि अशा रीतीनें कांहीं दिवस तरी या खाद्यावर त्यांची सुखानें कालक्रमणा होते.

कोण कुठला मनुष्य! त्याच्या त्या भानगडीचा आणि आपला अर्थाअर्थी काय संबंध? शिवाय भानगडी ऐकून आनंद होण्यासारखें काय असतें? परंतु माणसाला विपरीताची आवड असते हेंच खरें. कुठें कांहीं चमत्कारिक घडलें कीं माणसाला अगदीं सूक्ष्मसा आनंद होतो हें कांहीं खोटें नाहीं. सर्वच माणसांना विपरीत गोष्टींचा आनंद होतो असेंनाहीं; परंतु बहुतेकांना होतो असें मी पाहिलें आहे. मनुष्यस्वभावाचाच तो एक भाग आहे कीं काय असें मला कित्येकदां वाटतें. माझ्या लहानपणीं मी एक मनुष्य असा पाहिला आहे. त्याचें नांव नाना कुंटे. मनुष्य तसा गुणी होता. हरहुन्नरी होता. विनोदबुद्धीचा होता. आपल्या मानानें लोकांच्या उपयोगी पडणारा होता. परंतु गांवांत घडलेली कोणतीहि विपरीत गोष्ट पहाण्याची संधि हुकली तर त्याला मनस्वी दुःख होत असे. कोणाचीं घरें जळावीत, कोणाचें भांडण जुंपावें, कोणाला रोगराई व्हावी, असें त्याला कधींहि वाटत नसे; परंतु एखाद्याचें घर जळतांना पहाण्यांत त्याला मनस्वी आनंद होत असे. त्या पेटलेल्या घरावर तो स्वतः पाण्याच्या बादल्या आणून ओतील. दूरध्वनीनें आगीचा बंब बोलावील. आगींत सापडलेल्या माणसांना सोडवण्याचा प्रयत्न करील. परंतु हें सारें करत असतांना, घरांतून लवलवत बाहेर पडणाऱ्या त्या ज्वाळा, तो आकाश कोंदून टाकणारा धूर, आणि कडकाड आवाज करीत कोसळून पडणाऱ्या त्या माड्या, तुळ्या, यांच्या आवाजानें आणि दर्शनानें त्याला आंतल्याआंत एक प्रकारचें कसलें तरी चमत्कारिक सुख अनुभवात येई. कोणी आजारी पडलें तर नाना कुंटे त्याला औषध आणून देईल. त्याच्यासाठीं रात्रींची जागरणें करायला जाईल; परंतु आजाऱ्याच्या त्या यातना, त्याचें तें कण्हणें, त्याचा तो जीव घाबरणें, तापानें त्याच्या अंगाची तलखी होणें, या सार्‍या गोष्टी स्वतःच्या डोळ्यांनीं पहाण्यांत त्याला विचित्र सौख्य वाटत असे यांत शंका नाहीं. एवढ्यावरच हें थांबत नसे. बरं आपण पाहिलेल्या त्या दृश्याचें वर्णन सविस्तरपणें करण्यांत त्याला आंत आंत कसला तरी विक्षिप्त आनंद होत असे. कारल्याची भाजी कडूच लागते. डाळींब्याचा कडवटच लागतात पण चवीनें खाणाऱ्या माणसांना ही कडू, कडवट चव आवडते. तसेंच कांहीं कोहीं माणसांचें असावें असें मला वाटतें.

[illegible] एक प्रसि[illegible] संत नांवाची मै[illegible]



अनुक्रमणिका

आहे. अतिशय गोड स्वभाव आणि मधुर वाणी याबद्दल तिची ख्याति आहे. प्रमिला संत चार मंडळींत गेली कीं वातावरण आनंदानें भरून जाणार याची खात्रीच असे. परंतु या मुलींत एक विलक्षण गोष्ट आहे खरी! ओळखींत किंवा नात्यांत कोणी बाई बाळंत झाली तर तिचें मूल पहायला जाण्याचा वा तिचा समाचार घेण्याचा तिला नेहमीं कंटाळा येतो. परंतु 'एखादें' बेवारशी मूल कुठें कचऱ्याच्या पेटींत पडलें असल्याचें समजलें तर कधीं जाऊन तें पहातों असें तिला होतें. कधीं एकदां तें दिसतें व जीव शांत होतो असें तिला होऊन जातें. हातांतल्या कामावरचें तिचें लक्ष उडून जातें व त्या कचऱ्याच्या पेटीकडे ती तडक चालूं लागते. आणि परत आल्यावर मग दोन चार दिवस तरी तो विपय तिच्या मनांत घोळत राहतो. जो भेटेल त्याला सांगतां सांगतां तिची पुरेवाट होते. ह्या अशा गोष्टींचा हा गुणच असतो कीं तो कुणाला तरी आळवून आळवून सांगितल्याशिवाय त्याला लज्जत येत नाहीं. आणि ती लज्जत आल्याशिवाय तिची सांगता होत नाहीं.

ह्याचा अर्थ मनुष्य केवळ दुष्टच असतो असें नाहीं. तो केवळ क्रूरपणानेंच या गोष्टी पहातो असेंहि नाहीं. तो क्रूर नसतो. दुष्ट नसतो. तरीपण तो संपूर्णपणें सात्विक नसतो. दादा पानवलकर हे गृहस्थ साधूकोटींत बसण्यासारखे आहेत. त्यांचें वय आज ऐशींच्या आसपास तरी आहे. त्यांचा सगळा जन्म इतरेजनांचें करण्यांत आणि कुणाची ना कुणाची खरकटी काढण्यांतच गेला. त्यांना ना मूल ना बाळ! बायको वीस वर्षांपूर्वीच मरून गेलेली. घरांत माणसें आहेत ती आपली अशीच आऊचा काऊ करून बाळगलेली. या सर्व माणसांचें भलें करण्यांत पानवलकरांचा जन्म गेला. उरलेला जन्महि या सत्कार्यांतच खर्च होत आहे. दानशूर आणि धर्मशील म्हणून दादा पानवलकरांची ख्याति आहे. परंतु त्यांच्याहि स्वभावांत वरील गुणाचा भाग आहेच. कोणाचें वाईट होत असलें तर त्याला सदासर्वदा हात देणारा हा मनुष्य, कोणाचें वाईट होत आहे असें समजतांच एका सूक्ष्म आनंदानें मोहरून जातो. वाईट होण्याची क्रिया सुरूं झाल्यापासून ती पूर्ण होईपर्यंत दादा पानवलकर त्याची मोठ्या कुतुहलानें चौकशी करत रहातात. दुःख मिश्रित आनंदानें त्या वाईट होत जाणाऱ्या क्रियेची वाट पहात रहातात. एखादा मनुष्य मरायला टेकलेला असला, तर कधीं त्याची ती बातमी कानावर येते असें त्यांना होऊन जातें. अधीरपणानें त्यांचें मन सारखें वरखालीं होत रहातें. आणि मग येणारा जाणाराला ते विचारत रहातात "काय हो, तो गेला नाहीं अजून!"

ऐकणाराला मोठें विचित्र वाटतें. तो सांगतो कीं, "नाहीं. अजून तो गेला नाहीं. परंतु तो आतां लौकरच जाईल असें वाटतें.

"कशावरून?" दादांची उत्सुकता लपूं शकत नाहीं.

मग तो आलेला मनुष्य त्या जाऊं घातलेल्या माणसाचे किती हाल चालले आहेत ते आपल्या रसाळ वाणीनें वर्णनें करून सांगतो. आणि त्यानें जणूं कांहीं तृप्त होऊन, परंतु त्याच वेळीं दुःखानें भरून जाऊनहि दादा पानवलकर उद्गारतात, "हं!" आणि हाताचा पंजा हवेंत उडवतात.

परंतु हें जें दुःख असतें तें तेवढें निर्भेळ नसतें. निर्मळ नसतें. ह्या माणसाचे हाल होत आहेत हें ऐकून त्यांना दुःखापेक्षां आनंदच झालेला असतो. आणि त्याच वेळीं त्या माणसाला सर्व प्रकारची मदत करण्याचीहि त्यांची इच्छा असते. ती मदत करण्याची संधि पुढें पुढें जावी ती शुभवेळ लांबत जावी याचें त्यांना लहान प्रमाणांत कां होईना दुःखच होतें. आणि ते उद्गारतात "हं!"

परंतु त्या माणसाच्या दुर्दैवानें व दादा पानवलकरांच्या सुदैवानें ती वेळ एकदांची येते. म्हणजे त्या माणसाच्या त्या यातना संपतात. तो इहलोक सोडून जातो. आणि मग धावपळ करीत, विशेष उत्साहानें दादा पानवलकर त्याला नेण्याची व्यवस्था करतात. पैशाची झीज सोसतात. येणारा जाणाराकडे लक्ष ठेवतात. त्या गेलेल्या माणसाच्या मागें राहिलेल्यांनाहि मदत करतात. लोकांना अर्थातच वाटते, कीं मन केवळ दयेनें भरून गेल्याशिवाय कोण एवढें काम करील? कशाला उगीच झीज सोसेल?

त्यांचें म्हणणेंहि पुन्हां खोटें नसतें. दादांना दया वाटलेली असते हें खरेंच आहे. त्यांना दया वाटते आणि मायासुद्धां वाटते. त्यांना वाईट वाटतें. दुःख होतें; परंतु त्याचबरोबर त्यांना चमत्कारिक सुखहि झालेलें असतें. हें सुख त्यांना समजतें. परंतु असें सुख होतें याला त्यांचा इलाज नसतो. तें होऊं नये असें कितीहि वाटलें तरी तें त्यांच्या हातांत नसतें.

निवर्गी नांवाचे एक गृहस्थ आहेत. कुठें खाजगी दुकानांत त्यांना नोकरी आहे. जन्मांत कधीं त्यांच्या तोंडावरची माशी उडली नाहीं. मेंग्या निवर्गी असेंच लोकांनीं त्यांचें नांव ठेवलें आहे. हा माणूस जन्मल्यापासून आजतागायत सहसा कधीं हंसलेला नाहीं. त्यांच्यासमोर कोणी कितीहि विनोद केला, तरी त्यांना हंसू म्हणून येत नाहीं. ते आपले गंभीर आणि सुतकी चेहऱ्यानेंच वावरत असतात. विशेषतः लग्नकार्यासारख्या प्रसंगांतहि त्यांची कळी खुलल्याचें अद्यां कोणाला दिसलें नाहीं. परंतु कोणी निवर्तल्याचें समजलें म्हणजे त्यांना काय होतें कोण जाणे! निवर्गींच्या आनंदाला मग पारावार रहात नाहीं. त्यांना आपलें नकळत हंसूच येऊं लागतें. इतकें कीं मनुष्य निवर्तल्याची बातमी हंसण्यामुळें त्यांना धड सांगतांहि येत नाहीं. ती आतां कुणाकुणाला सांगूं, आणि किती माणसें जमवूं असें त्यांना होऊन जातें. पहिल्या पहिल्यांदा निवर्गी आज कां हसतात तें लोकांना कळत नसे. परंतु आतां त्यांना माहीत झालें आहे. निवर्गी हसूं लागले कीं लोक समजतात. कोणी तरी महायात्रेला निघाले आहे. फक्त आतां कोण तेंच कळायचें राहिलेलें असतें.

निवर्ग्यांना अशा वेळीं नुसतें हसूंच येतें असें नाहीं, तर त्यांना कामाचें विलक्षण अवसान चढतें. कमालीचा उत्साह वाटूं लागतो. त्यांची हालचाल अतिशय झपाट्यानें होऊं लागते. निवर्ग्यांनीं त्या दिवशीं सुटीच काढलेली असते. हां हां म्हणतां तय्यारी



अनुक्रमणिका

होते. आणि महायात्रेला निघालेला मनुष्य वाटेला लागतो.

मी पुष्कळदां विचार करते आणि थोडा वेळ मला आश्चर्य वाटतें. दादा पानवलकर काय, प्रमिला संत काय, निवर्गी काय, हीं सारीं माणसें कांहीं दुष्ट नाहींत. छे छे! तीं अतिशय चांगलीं माणसें आहेत. परोपकार करणारींच आहेत. आजपर्यंत त्यांनी कोणाचें कधीं वाईट चिंतिलेलें नाहीं. एखाद्याची बायको एखाद्याबरोबर पळून गेल्याचें समजलें तर त्यांत रस घेऊन बोलणारीं माणसें जिवाचे कान करून ऐकणारी माणसें हीं कांहीं दुष्ट, नष्ट किंवा चांडाळ नसतात. परंतु घर जळल्याचें समजतांच नाना कुंटेला जो आनंद होतो, तो जसा कांहीं अपरिहार्यपणेंच होतो. याचें कारण मला वाटतें, माणसाची बुद्धि सर्व प्रकारचे अनुभव घेण्यास नेहमीं तयारच असते. माणसाच्या मनाला जसें गोड आवडतें, तसेंच तिखटहि आवडतें. आणि कडूहि आवडतें. आपण कांहीं केवळ तिखट खाऊन जगत नाहीं. केवळ गोड खाऊन जगत नाहीं. आपल्याला एखादी कडवट चवसुद्धां आवडते. आपल्या जीवनांत जे अनेक रस आहेत ते सगळेच कमी अधिक प्रमाणांत आपल्याला आवडतात. जसा हास्यरस आवडतो, तसाच करुणरसहि आवडतो. त्या कारुण्यांत एकप्रकारचें जें दुःख असतें तेंहि आपल्याला सुखवीत असतें. आणि जसें कारुण्य आवडतें, तशीच भयानकता आणि रौद्रताहि आवडते. आपल्याला केवळ कथकली नृत्यच आवडत नाहीं. तांडवनृत्यहि पहावेसें वाटतें. भयानें आपण थरकापून जातों. प्रलयकालाच्या कल्पनेनें आपण शहारून उठतों. परंतु या भयानकतेंत जें एक रौद्ररूप असतें, जें भीषण सौन्दर्य असतें तें सध्यां आपल्याला आवडतें. आवडत नाहीं आणि तरीहि त्या भीषण सौन्दर्याची चमक आपल्याला मोहविते. आपल्याला एखाद्या लहान मुलाचे निरागस डोळे भुरळ घालतात. एखाद्या सुंदर युवतीचे सुंदर काळेभोर विशाल डोळे भूल पाडतात. कोणाकोणाचे निळ्या सरोवराप्रमाणें दिसणारे निळे डोळे आपल्या मनाला आणि डोळ्यांनाहि एक प्रकारें शांत सौन्दर्याचा प्रत्यय आणून देतात. त्याचबरोबर वाघाचे क्रूर डोळेहि आपल्याला पुन्हां पुन्हां पहावेसे वाटतात. तें भीषण, भयानक सौन्दर्य आपल्याला आवडत नाहीं हें खरें असलें, तरी त्या भीषणतेंत आपल्याला खेचून घेण्याचें सामर्थ्य असतें, यांत मुळींच शंका नाहीं. आपल्याला जीवनांत जे विपरीत अनुभव येतात, त्यांचें असेंच असतें. आणि त्याचीच अदृश्यपणें भुरळ पडते. भीषण, भयानक सौन्दर्याच्या अनेक छटा असतात. या छटा भोळ्या सौम्य असल्या तर त्यांना आपण केवळ विपरित म्हणतो. या छटा जरा जास्त गडद असल्या तर त्याला भयंकर म्हणतो. परंतु विपरीताच्या पोटांत शिरून पाहिलें तर कमी अधिक प्रमाणांत तें भयानक, भीषणच असतें. आणि त्याचीच आपल्याला कधीं कधीं आपली इच्छा नसतांनाहि ओढ वाटते. नाहींतर हे सारे भीषण प्रकार पहावेत, त्यावर विचार करावा, आणि ते इतरांना सांगावेत असें माणसांना कां वाटतें? ••













# प ति व्र ता

*तिचं कलंडलेलं शरीर ताठ झालं. धरणीकंपानं जमीन हादरावी तसं तें हादरूं लागलं आणि त्या कृश शरीरांतून एकदम शब्द फुटले—*

*' मेल्या, कसाबा, मांगा......*

वीतभर लांबीरुंदीच्या त्या झोपडीवजा खोलींत काळोखाचं साम्राज्य पसरलं होतं. एका कोपऱ्यांत त्या काळोखाचा कब्जा मिळविण्यासाठीं एक छोटासा कंदील उगाचच धडपडत होता. कांहीं काळापूर्वीं जिथं मारुतीचा निर्जीव देह पडला होता ती जागा आतां सारवली गेली होती आणि एक लहानशी पणती तिथं जळत होती परंतु तिच्यांतही फारसा राम नव्हता.

बाहेरचा चिखल तुडवून बऱ्याच बायका आंत येत होत्या. कांहीं पुन्हां चिखल तुडवायला बाहेर पडत होत्या. प्रत्येकीचा पदर डोळ्याला लावला जात होता. कांहींच्या डोळ्यांत खरे अश्रू होते तर कांहीं नसलेले अश्रू पुसत होत्या.

कांहीं काळ अंधाराशीं दोस्ती केल्यावर त्या खोलींतील निरनिराळ्या आकृती बऱ्याच जवळ स्पष्ट दिसूं लागल्या. एका भिंतीशीं तीस–पस्तीस वर्षांची सखू धाय मोकलून रडत होती. तिच्या कपाळावरचा पांढरटपणा तिच्यावर नुकत्याच कोसळलेल्या वैधव्याची साक्ष देत होता. तिच्या अंवतीभंवतीं जमलेल्या बायका तिचं निरनिराळ्या शब्दांनीं सांत्वन करीत होत्या.

" अगबाई, मरण का कुणाला टळलं आहे ? काय करणारबाई ?"

"तर काय! आपल्यासाही जायचं आहे एके दिवशीं!" कजरीबाई डोळे पुसत म्हणाली.

"तुझ्या नवऱ्याचं बघायला तूं तरी होतीस. आतां तुझं तूंच सांभाळायला हवं; तुला का मूल आहे का बाळ आहे, खरं कीं नाहीं."

यावर सखू आणखीच जोरजोरानं रडूं लागली होती. तिच्या हुंदक्यानं तिचं सारं शरीर हादरत होतं. अंवतीभंवतीच्या बायकांचेही डोळे खरोखरच भिजले होते. कांहींनीं नाकं पुसलीं, कांहींनीं घसे खांकरले.

एक म्हणाली—"खरंच एक पोर तरी द्यायला हवं होतं देवानं हिला. नवरा नाहीं तर नाहीं पोराचा तर विसावा झाला असता."

दुसरी म्हणाली—"अग बया, नशिबाचे खेळ म्हणतात ते हे. नको तिथं भाराभार देईल, नाही तिला वांझ करील. आमच्याकडे बघाना, टोपलीभर आहेत. एकाला पोटभर जेवण मिळत नाहीं."

वांझ या शब्दावर सखू आणखी मुसमुसून रडूं लागली.

"नको रडूंस बाई, रडण्यानं का गेलेलं माणूस परत यायचं? माझ्या नवऱ्याला जाऊन तीस वर्षं झालीं, दहा वर्षांची पण नसेन मी तेव्हां. कुणाला सांगायचं? पाट लावायचं होतं, पण कुणी मिळालं पाहिजे ना?"

बायका तिचं सांत्वन करीतच होत्या. आणि सखू पाण्याला उकळी फुटावी त्याप्रमाणं दुःखानं नुसती उकळत होती. रडून रडून तिच्या डोळ्याचं पाणी आटलं होतं आणि दुःखाचं ओझं वाढत होतं.

कोपऱ्यांतील कंदील धापा टाकूं लागला होता. पणतींतील वात पेंगूं लागली होती. एका बाईनं उठून वातीला जाग येण्याकरितां थोडी पुढं ढकलली. चुलीजवळ पहारा करणाऱ्या घासलेटच्या बाटलींतून तिनं उरलंसुरलं तेल कंदिलांत ओतलं. आणि त्याला दोन घटकांचं जीवदान दिलं.

पुरुष मंडळी मारुतीच्या देहाला मूठमाती देण्याकरितां गेली होती. बाहेरचा चिखल वाढत होता; अंधार वाढत होता. दाराशीं पोरंबाळं जमली होती. मृत्यू, जन्म आणि लग्न त्यांना सारींच सारखी होतीं. नेहमीपेक्षां कांहींतरी निराळं होणं यांतच त्यांना करमणूक वाटत होती.

'सखूचा नवरा मेला' म्हणून तीं एकमेकांना सांगत होतीं आणि त्याचवेळीं विटी, दांडू, कैऱ्या, भोवरा, सर्कस अशा निरनिराळ्या विषयांवर बोलत होतीं.

येणारे जाणारे लोकही क्षणभर दाराशीं थांबत होते. काय झालं म्हणून विचारीत होते.

'अरेरे, फार वाईट झालं!' असं म्हणत पानाचा रंग इकडे तिकडं उधळीत निघून जात होते.

सखूचं रडणं अखंड चालूच होतं.

बाहेर येणाऱ्या बायका कुजबुजत होत्या, "बिचारी खरी पतिव्रता, मेलेल्याला वाईट बोलूं नये. पण बाई बाई, काय जांचलंय मेल्यानं—काय जांचलं आहे."

"अगोबाई, एक दिवस सुखाचा माहीत नाहीं बिचारीला."

"लग्नाला चांगलीं वीस वर्षं झालीं असतील ना!"

"नाहीं तिला रूपानं शोभणारा, नाहीं वयानं!" पानाची पिचकारी उडवीत एक बाई म्हणाली.

दुसरी म्हणाली—"पहिल्या रात्रीपासनं जांच. राक्षस मेला. हिचं वय काय, त्याचं वय काय! मेला झिंगून पशु झाला होता नुसता."

"तुला कसं ग माहीत?"

"वा! म्हणजे काय? अहो, सखूची आई आणि मी जणुं बहिणी बहिणी! काय रडली तिची आई, खूप सांगितलं नवऱ्याला कीं मारुतीला तिची मुलगी देऊं नका म्हणून, पण तेरीचा बापहि व्यसनी. दारूच्या बाटलीवर केला सौदा."

"बिचारी—"

"तरी कशी रडते बघा त्याच्यासाठीं! दोन तास झाले, पण पाणी खळलं नाहीं डोळ्यांचं! हिला म्हणावं पतिव्रता!"

"हो. नाहींतर आपल्यामध्यें पाट लावायची कुणाची चोरी आहे का?"

"खरंच लई सहन केलं. अंगावर एक फुटका मणी राहूं दिला नाहीं मेल्या मांगानं. किती वेळां उपाशी पोटानं रात्र काढली आहे बिचारीनं!"

"नाहींतर काय, हिनं काबाडकष्ट करून दोन पैसे आणायचे आणि मारुतीनं ते सारे बाटलींत ओतायचे. कपडे काय, भांडीं काय आणि पैसे काय? सारं घर धुऊन काढलं त्यानं त्या दारूनं."

"हो बाई. दारू म्हणजे आमच्या लोकांचं मरण! सरकारनं दारूबंदी केली पण ऐकतंय कोण? त्यादारूपायीं कितिकजणींचे संसार उधळले देव जाणे!"

रस्त्यावरचीं पोरं हें सारं कान लांब करून ऐकत होतीं. सखूचा निरोप घेऊन जाणाऱ्या बायका आणि तिच्याकडे येणाऱ्या बायका ओटीवर थांबत होत्या, एकमेकींना दुजोरा देत होत्या.

एक म्हणाली—"खरंच, बिचारीला पोर व्हायला हवं होतं!"

"अवं कुठून होणार? नवऱ्यांतच दोष होता म्हणे!"

"एकदां समजावून पटवून माझ्या धन्यानं त्याला एका डॉक्टर-कडे नेलं होतं. सरकारनं काय ते दवाखाने खोलले आहेत ना पोरं होण्यासाठीं आणि न होण्यासाठीं? तिथं तपासलं होतं मारुतीला! डॉक्टर म्हणाले त्याच्यांतच दोष आहे."

"काय ग सखूला पण तपासलं होतं ना?"

"हो ना—पण तिच्यांत कांहीसुद्धां दोष नाहीं."

"मेल्याचं एक धड नव्हतं."

आणि मग स्मशानांतून येणाऱ्या बाप्यांच्या न्हाण्याधुण्याची व्यवस्था करण्याकरितां बहुतेक बायका निघून गेल्या. जातां-जातां सखूला दोन घांस खाण्याचा आग्रह करून गेल्या. पण त्यांनीं आणलेल्या अन्नाचा सखूनं वाससुद्धां घेतला नाहीं.

मारुतीच्या देहाला अग्नि देऊन पुरुष परत आले तेव्हां तर सखूनं जोरानं हंबरडा फोडला. पुरुषांचीहि काळजं थरारलीं. तेहि आपापसांत कुजबुजूं लागले, "खरंच, इतकं

**स्नेहप्रभा प्रधान**








दुःख नव्हतं पाहिलं. आपण आपल्या देशांतच पहाव्यात असल्या पतिव्रता.''

'' तर काय, तसं पहायला गेलं तर मारुतीनं गेल्या पंधरावीस वर्षांत काय कमी छळलं होतं बापडीला ? ''

'' काय होती दिसायला, पण आतां साऊली राहिली आहे नुसती.''

आणि मग पुरुषहि आपापल्या घरीं निघून गेले. त्यांतील वडिलधाऱ्या पुरुषांनी जातां जातां सखूला दिलासा दिला, '' आमच्या मुलीसारखी आहेस तूं—घाबरूं नकोस. दुःख आवर आतां. नाहीं बघवत.''

उरल्यासुरलेल्या बायकाहि पांगल्या. फक्त एक विधवा बाई रात्रीला सखूच्या सोबतीला थांबली.

साऱ्यांच्या झोपायची वाट पाहून कंदीलानेंहि कंटाळून मान टाकली होती. पणतींतील ज्योत कशीबशी जांभया देत जागी होती.

कांहीं वेळानं सोबतीला राहिलेली बाईही डुलक्या देऊं लागली. आणि मग घोरूं लागली.

सखूचं रडणं चालूच होतं. पण तेंही थांबलं. भिंतीशी कलंडून ती त्या काळोखांत आपल्या आयुष्याचा चित्रपट डोळे फाडफाडून बघूं लागली.

दहाव्या वर्षी दारुड्या बापाच्या घरून निघून दुसऱ्या दारुड्याच्या घरीं आली होती. पहिल्या रात्रीच्या आठवणीन तिचं रक्त आजही गोठत होतं. दारूनं धुंद झालेल्या तिच्या नवऱ्याला फक्त तिचं शरीर दिसलं होतं. ती दिसली नव्हती. आणि अशा कितीतरी रात्री आणि दिवस—हो दिवसहि तिनं त्याचे अत्याचार सहन केले होते.

तिच्या आईनं मोठ्या शिताफीनं जपून ठेवलेले आणि लग्नाच्या वेळीं तिला मोठ्या प्रेमानें दिलेले दोन सोन्याचे मणी दोन दिवसांतच सराफाच्या घरीं पोचले होते.

तिला वाटलं होतं '' करूं देत मेला जांच करतो. मूल झाल्यावर त्याचा तरी विसावा होईल ! ''

दर महिन्याला ती त्या बालकाच्या येण्याची वाट पाही आणि दर जाणाऱ्या महिन्याबरोबर तिच्या नजरेंतला भकासपणा वाढत जाई.

शारिरिक जांच, गरिबी, यानं खंगलेलं तिचं मन आणि शरीर दिवसेंदिवस अधिकाधिक खंगत चाललं.

आणि एके दिवशीं तिला पुरतेपणीं कळून चुकलं कीं तिला कधींच मूल होणार नाहीं. शेजारणीनं येऊन सांगितलं कीं ' तुझ्या नवऱ्यांतच दोष आहे, तुझ्यांत नाहीं.'

कधींच न राहिलेल्या गर्भाचा मृत्युलेख ऐकून तिनं रडून रडून डोळे आटवले होते. सुखाच्या आशेचीं सारींच किरणं मावळल्यामुळें तिची जगण्याचीही वासना नाहींशी झाली होती.

माहेरीं गेलं कीं तिची आई म्हणायची— ''सखू, सोड त्याला, दुसऱ्या कुणाशीं पाट लाव. तो मेला तुला काय सुख देणार आहे.''

पण तिचा बाप म्हणायचा— '' खबरदार, सोन्यासारखा नवरा दिलाय. डोचके फोडून टाकीन ''

आणि मग तीची आईही निघून गेली.

आईची आठवण येतांच सखूचं कलंडलेलं शरीर ताठ झालं. धरणीकंपानं जमीन हादरावी तसं तें तिच्या हुंदक्यानं हादरूं लागलं. तिला आई नव्हती आणि ती कुणाची आई नव्हती.

आणि मग त्या कृश शरीरांतून एकदम शब्द बाहेर फुटले—

'' मेल्या कसाबा, मांगा—मरायचं होतं तर फार पूर्वी कां नाहीं मेलास म्हणजे दुसऱ्या कुणाशीं तरी लग्न केलं असतं. नसतं मिळालं कदाचित मला त्याच्याकडून सुख. माझी ओटी तर सुखावली असती.''

मग तिच्या हुंदक्यानं ती खोलीहि हादरूं लागली. तिच्या सोबतीला येऊन घोरत पडलेली बाई दचकून जागी झाली आणि घाबरून ओरडली—

'' सखू, सखू, काय झालं ग ? ''

आणि त्याच क्षणीं सारं बळ एकवटून पणतींतील वातीनं एकदां वर मान करून सखूकडे पाहिलं आणि तीहि अंधारांत गडप झाली.

—※—



# सुप्रीत पीतांबर

— राजा बढे

## सर्ग १२ वा

जातां सोडुनि सखिवृंद, मनोमनिं तिज हो आनंद
नुरली भीती संकोच, सुटला लाजेचा जाच
तरिही मिटते ना लाली, रक्तिमा रेंगाळतो गालीं
पाहतां पुढें कुसुमशेज, खुणेची पापणींत नीज
रंगली कानांची पाळी, कंचुकी होई वरखाली
दाविते मंदहास्य ओठीं मीलनीं कुतूहल, उत्कंठा
चाळवी अनंग कां ऐसा उतावीळ झाली वैकुंठा
आतुरा हौसमनीं मोठी यावया मिठींत जगजेठी
नको रे छळूं अतां देवा उमलत्या फुलत्या राजीवा
सखीचा न हो मनोभंग बोलला हळूंच श्रीरंग
'जिवलगे येइ गडे जवळीं' पुलकित होय तनू कवळी

**प्रबंध २२** ( रागः विभास—एकताल )

प्रमदे, पुरवि मनोरथ गे
मन्मथ मनिं चेतला जिवलगे । पुरवि मनोरथ गे

कुसुमसुकोमल रचिली शय्या, वैरिण तुजसी अदया
ठेवि सखे सुकुमार पाउलें लाजवि सुमना निचया
चुरडुनी गर्व हरी सुभगे ॥ प्रमदे ॥ १ ॥

येतां दुरुनी थकलिस बाई, चुरण चुरूं दे मला
अनुसरती तुज पैंजण शयनीं, असुं दे पायातला
रुणुझुण पायिं तुझ्या विलगे ॥ प्रमदे ॥ २ ॥

बोल मंजुले, सुधामधुरती मज अनुकूला वाणी
संकोचाचा पदर आडवा नको गडे या स्थानीं
लपविते लाज गुपित सुभगे ॥ प्रमदे ॥ ३ ॥

दूर करूं दे चीर रुचिर हें कुचांवरुनिया आतां
तुझ्या नि माझ्या मधें दुरावा नकोच अडवूं हाता
म्हणावे होय राहुनि उगे ॥ प्रमदे ॥ ४ ॥

अधरामृत मधुपान करूं दे अचेतना जगवाया
गोलीं चुंबनलाली वठतां महिरुनि जाई काया
करि गे मृतमानस जागे ॥ प्रमदे ॥ ५ ॥











अनुक्रमणिका

विरहानल हा जाळित हृदया मदन सारखा छळी
करपुनि जाई प्रीत उमलती ओठांची पाकळी
शांतवी दाह प्रेमगंगे ॥ प्रमदे ॥ ६ ॥

ऐकवती ना मधुर कूजितें, वसंत कोकिळपंची
रुमुंझुमुं दे मेखला, शशिमुखी; श्रवणा होय विपंची
छेडिता तार श्रुतिरंगे ॥ प्रमदे ॥ ७ ॥

विकलदशा ही पाहुनि माझी, मनिंच्या मनिं तूं हससी
होसि अधोमुख, नयन निमीलित विनयें लाजुनि बघसी
पापणी हितगुज मज सांगे ॥ प्रमदे ॥ ८ ॥

विफल रात चालली सखे ग करि मजवरि अनुकंपा
झालें गेले विसरुनि बाई, सोडि अकारण कोपा
मानिनी प्रीति, मान भंगे ॥ प्रमदे ॥ ९ ॥

करि अनुनय माधव राधेचा होय प्रिया अनुकूला
गाई श्री जयदेव कवी या युगुलांच्या रतिलीला
रंजवी रसिका संयोगे ॥ प्रमदे ॥ १० ॥

( प्रबंध २२ समाप्त )

देतां दृढ आलिंगन, नागिणिची ती लपेट
आड येति पुलकबंध नाजुक गालीं चपेट
पाहतां तिच्याकडे घे मिटून लोचना
कुजबुजती मंजु ओठ, अडवि अधर चुंबना
कटि जवळो आवळितां, किणकिणते मणिरशना
आंदोलविश्वसन, वसन करि मधेंच वंचना
सुरतसंग उत्संगा जवे धरून आर्जवा
साधिताहि साधतो न हर्ष येइ आडवा

*　　*　　*　　*

उभार भार दडपित हो कुच कठोर कोवळे
नख कोरिति ओरखडे अंग अंग डंखिलें
कवळि जवळि उरि धरुनी, अंग ठेवि दाबुनी
चाउनियां गाल दशनदंश करित चाळणी
ओठावर रक्त ठसे, डसे प्रदीर्घ चुंबनीं
ठेविश्वास कोंडुनीच बोलुं दे न कामिनी
धरी मुठींत केश झुकवि वाकवी तया बळें
ताडितसे श्रोणितटें कामदेह हिंदकळे
सैल होइना विळखा जखडि पिळुनि नागिणी
करि कमान वाकवुनि मदांध हो नितंबिनी
हालवून कटिबंधा झाकि जघनसंपुटे
मदनोन्मादें सखिचें सहज देहभान सुटे
दुखवि देह, सुखविति या मना असंख्य वेदना
अनंग खेळतो असाच चेतवीत भावना
अंगावर घेइ डाव जिंकिताहि हारवी
प्रीतीचे क्रूर खेळ, रीत ही नसे नवी

×　　×　　×　　×

मदालस लालस राधा सजे
रती विपरीत कराया धजे

प्रियातें सहज हारवाया
विजयिनी होइन मी जाया
अंगना अंगावरती निजे ॥ १ ॥

जाहले स्तब्ध जघन दोन्ही
हलेना बाहू कवळोनी
पयोधर घर्मजलानें भिजे ॥ २ ॥

भीतिनें घे झांकुनि डोळे
शिथिल ती अंगावरि लोळे
स्मरकंदनिं चंदन झिजे ॥ ३ ॥

कसा साधावा पुरुषार्थ
श्रम हे पुरे होति व्यर्थ
जुळेना जुळतें पुरुषास जें ॥ ४ ॥

आणिते उगाच अवसान
साधतें मुळीं न संधान
तियेचें पौरुष निमिर्षी विझे ॥ ५ ॥

×　　×　　×　　×

आला तिजसी थकवा लोळतसे धुंद मनीं
जागरणाची लाली भरली तिचिया नयनीं
सुटले कुंतल वेणी झाले ग ओठ फिके
चुरगळली गंधफुलं उरले हे देठ मुके
वक्षःस्थलि कोरियली नखरेखित ही लेणीं
पुसलें काजळ गालीं विस्कटली ग वेणी
वाट चुके कंचुकिही शालु तो कुठे न दिसे
तळहातें कुचकोरक, जघनबिंब झांकतसे
पंचशरें विकलकाय श्रांत क्लांत राधिका
पाहुनिया कामिनि ही मोहित हो शामसखा

×　　×　　×　　×

क्षीरसिंधुतीरावरि सखये वरिलेस मला
तुजवरती मोहुनियां शिवशंकर होई खुळा
परि झालिस तूं माझी, परिणय हुकला म्हणुनी
जाहला निराशमनीं कालकूट वे पिउनी
ऐकतसे पूर्वकथा, ध्यानमग्न ती रमणी
राहिलें न भान, उरीं अंचल सरला उडुनी
दिसत गौर-कुचमंडळ बघत गौरवें हरी
रक्षिल तो मधुसूदन दुरितांचे तिमिर हरी

*　　*　　*　　*

केश विखुरले सुटली वेणी, गालीं विलसे दंव
ओठावरती दंतव्रण, हे कुचकलशीं मार्दव
हार मानितो हार फुलांचा नितळ तनू गोजिरी
शालू फिटला, नसे कंचकी त्रिवली मंदोदरी







अनुक्रमणिका

माज मेखला, सरली खाली, मूक जाहले मणी,
विगलित वसना नग्नगौरवा निरखि चोरपापणीं
पुष्टनितंबा रतिविनवातें झांकुनि घेई करी
अंकावरती अंक ठेउनी, ती मन्मथ मंजिरी
रक्तगौर त्या भुगोलार्धा सावरीत घडिघडी
करकमलानें लपवी फिरवी गौरभूजाची घडी
लाजुनि पाही तनू गोरटी आपुलीच आपण
अनावृत्त राधिका जिंकिते परी हरीचें मन

* * * *

शिथिल तनू ती थकली राधा लीलामन्मथरती
अर्धे उघडे लालस डोळे, ऊर उसासे किती
सैल जाहले बंध भुजांचे, गळोनि पडली मिठी
सुकली लाली ओठावरली स्वप्न पाहते दिठीं
रदनकांतिनें ओठ उजळले मूकभाव बोलके
श्वासानें आंदोळति झुलति कंपित कुचकोरकें
ऐकूं येइ न गिरा अक्षरें अधरीं ओठंगती
या अधराची सुधा प्राशितां धन्य होय जगतीं

× × × ×

अनंगकृता विमुक्तबाधा राधा रतिसुंदरा
मुग्ध करी आधीन प्रियकरा सहज शामसुंदरा
'सख्या जिवलगा, पुरवावी ही हौस माझिया मनीं'
'मला भूषवा अपुल्या हातें' बोलतसे कामिनी

**प्रबंध २४ (रामकली-यतिताल)**

यदुनंदनातें विनवी राधा हृदयानंदिनी
काढि गडे मृदुचंदनचित्रें
शीत-सुगंधित अपुल्या हातें
मदनकलशकुच मृगमद रंगवी रंजनी ॥ १ ॥
मन्मथशर भ्रमरांचे चंचल
चुंबित नयना पुसलें काजळ
करांगुलीनें घालि लोचनीं उचलुनिया पापणी ॥ २ ॥
रोधिति नयनकुरंगा कामी
श्रुतिमंडल हे मनसिज रश्मी
कर्णभूषणां कुंडलकांती लज्जित अनुरागिणी ॥ ३ ॥
कमलमुखावरी खेळति अवखळ
कचसंभारा भुललें अलिकुल
गुंफि गडे ही माझी वेणी रची कुंतलबंधनीं ॥ ४ ॥
श्रमजलबिंदू विलसति भालीं
चंद्रकोर कस्तुरी रेखिली
पुसुनी स्वकरें राजिवनयना प्रज सजवी चित्रांकणी ॥ ५ ॥
मदनचापरें मयुरपिसारा
विंचरुनी या कचसंभारा
माळि वेणि वनमाळी चतुरा पुष्प सुगंधित गुंफुनी ॥ ६ ॥
मस्त मतंगज मदनकुहर कीं
मांसल नितंबबिंबें विलोकी
रत्नखचित मेखला घालुनी नेसवी वसना भूषणीं ॥ ७ ॥
हरिचरणीं रत रसिकजना
जयदेवाची रसवी रसना
कलिमल हरुनी सुखवी अवनी दुरितांच्या भजनीं ॥ ८ ॥

* * * *

**(प्रबंध २४ समाप्त)**

कुच कर्कश कुरकुरनी करि गौरव कस्तुरि चर्चुनि रंग भरी
मुख चुंबुनि रंगवि गाल तिचे परिरंभित तो चितरंग हरी
उरि कचुकि चंद्रविचित्र उटी कटिमध्य मणीरशना सजवी
करचंचल गौरभुजा धरुनी करि सुंदर अंगद ते चढवी
करि कंकण कांचनमाळ गळां, पदिं पैंजण घालित शामसखा
चतुरा तिज भूषविता करितो प्रिय आवडल्या लडिवाळ चुका
थरकांपत ती ललितांगलता पुलकावलि दावित आपुलकी
मनहौस तिची पुरवीत हरी कुतुकें बघते तिज दृष्टि मुकी.
अनुकूल तयास दुकूल हि हो सरते न वरी पुढे चकवी
करि नेसविलां रुचिरा वसना रतिसंग सुवासन तें लपवी
कुरवाळि हनू, कवटाळि तनू कुचचेपवितां चुचुकामुखवी
सित्कार करी सत्कार तरी दुखवीत सुखास नवीन चवी

× × × ×

शेषफणाशिखरश्रेणी अगणित मणि कांती
प्रतिबिंबित अमित नयन शाममदनमूर्ती
शेषशयनि चुरित चरणद्वय धरुनि अंकीं
बिंब लोचनीं रमेस नेणतां विलोकी

× × ×

सोडि सख्या अभिमान मधा तूं, बैस उगी शर्करे !
द्राक्षमाधुरी फिकी, सुधे गे, दैव तुझे ही फिरे
तुझें जाहलें पाणी दुग्धा ! अधर बिंबच संपलें
नीरसपण तुज आलें आम्रा, मरंदजल शिंपिलें
जयदेवाची हा रसवंती नवरसमधुमंजिरी
श्रृंगाराची खनीच केवळ जोंवर अवनीवरी

**सुप्रीत पीतांबर सर्ग १२ समाप्त**

**:- श्रृंगार श्रीरंग संपूर्ण :-**



*१९४९ च्या जानेवारी महिन्यांत फ्लोरा फाऊंटन जवळ ब्रुस स्ट्रीटवर जो दरोडा पडला तो अत्यंत अभूतपूर्व आणि लोकविलक्षण असा होता. दरोडेखोरांनीं मागें कसलाच पुरावा न ठेवल्यामुळें पोलिसांची मति अक्षरशः गुंग झाली होती. तरीपण पोलिसांनीं या गुन्ह्याचा अखेर जो तलास लावला त्याची ही रोमहर्षक कहाणी—*

पाकिस्तानमधील चंद्रळपूर जिल्ह्यांतील धामण गांवची गोष्ट !

एक दिवस दुपारीं ताडपत्रींनी आच्छादलेली भली मोठी लॉरी गांवांत शिरली. लॉरींतून एक माणूस हळूंच खालीं उतरला. त्याच्या वेषावरून तो कुणीतरी श्रीमान् व्यापारी असावा असें वाटत होतें. बहुची व्यापारी घालतात तसा फेटा त्यानें डोकीला बांधला होता. असा कुतुहलजनक माणूस एका लॉरींतून गांवांत शिरल्यावरोबर अनेक पोरंटोरं, खेडूत आणि कांहीं रिकामटेकडे त्याच्याभोवतीं जमा झाले. त्या श्रीमान् व्यापाऱ्यानें अगदीं मनमोकळ्या भाषेंत खेडुतांशीं गप्पा मारायला सुरवात केली. गांवांतल्या तंबाखूच्या व्यापाऱ्यांबद्दल चौकशी केली. कारण चंद्रळपूरचा तंबाखू म्हणजे अख्ख्या पाकिस्तानांत प्रसिद्ध. इकडच्या तिकडच्या गोष्टी केल्यावर त्या व्यापाऱ्यानें अगदीं सहजगत्या विचारलं.

"काय हो, तुमच्या गांवांत कुणी बाहेरगांवचा परदेशी येऊन राहिलाय ?"

"छे छे. कुणीच नाहीं !"

"तसा कुणी परदेशी नव्हे, आपल्यापैकींच—एखादा पठाण ?"

खेडुतांनीं एकमेकांकडे पाहिलं. इतक्यांत कुणीतरी म्हणालं,

"अरे हो, नाहीं कसा ? आपला शेरमहंमद नाहीं का आलाय ?"

शेरमहंमदचं नांव ऐकतांच त्या व्यापाऱ्यानें जरादेखील चलविचल दाखविली नाहीं. तो म्हणाला, "अस्सं—म्हणजे शेरमहंमद आलाय तर. काय करतो तो इथं ?"

"हैवान आहे तो ! अगदीं माणूसघाण्या. कुणाकडे जात येत नाहीं. अख्खा दिवस आपल्या झोंपडींत पडून असतो." कुणीतरी म्हणालं.

"राहातो कुठं तो ?"

"या पाठीमागच्या घरांत—आई आहे त्याची." शेरमहंमदची माहिती मिळू लागली.

व्यापारी म्हणाला, "मला त्याला धंद्याच्या कामासाठीं भेटायचंय. आपला जुना दोस्त आहे तो ! तो घरीं केव्हां येतो हें कुणाला माहिती आहे ? जरा चौकशी करून या, तंवर मी थांबतो इथं."

पंधरा मिनिटांनीं एक उत्साही खेडूत बातमी घेऊन आला, कीं शेरमहंमद आतांच घरीं आलाय. ही बातमी कळतांच लॉरींत बसलेले पोलिस बाहेर आले आणि त्यांनीं शेरमहंमदच्या झोंपडीभोवतीं कडं केलं. तंबाखूच्या व्यापाऱ्याचा हा नवा अवतार पाहून गांवकरी घाबरलेच. व्यापारी शेरमहंमदच्या घराजवळ गेला आणि त्यानें दारावर थाप मारली. शेरमहंमदची सत्तर वर्षांची म्हातारी आई बाहेर आली आणि तिनं विचारलं,

"कोण पाहिजे ?"



अनुक्रमणिका

" मला शेरमहंमदला भेटायचंय "

" शेरमहंमद इथं नाहीं " असं उत्तर देऊन म्हातारी आंत वळली आणि तिच्या मागोमाग व्यापारी आंत शिरला. पडद्याआड शेरमहंमद लपला होता. व्यापाऱ्यानें शेरमहंमदची मान धरली. त्याच्या जबरदस्त विळख्यांतून सुटण्याचा शेरनें जोराचा प्रयत्न केला. इतक्यांत चारपांच पोलिसांनीं त्याला हातकड्या घातल्या. शेरमहंमदनें व्यापाऱ्याला विचारलें.

" हैवान् तूं आहेस तरी कोण ? "

व्यापाऱ्यानें आपला काळा चष्मा दूर केला, बलुची फेटा काढला. आणि त्याला विचारलें " हमको पहिचाना ? " शेरमहंमदनें डोळे विस्फारून त्याच्याकडे पाहिलं आणि म्हटलं " अरे, अरे तुम इधर पाकिस्तानमें भी हमारे पीछे आये ? "

व्यापारी नुसता हंसला. तो व्यापारी म्हणजे दुसरा तिसरा कोणी नसून मुंबईशहर पोलिसचा हेडकॉन्स्टेबल फाझल हुसेन खान हा होता.

**विलक्षण दरोडा**

२४ मार्च १९४९ रोजीं शेरमहंमदला झालेली अटक म्हणजे मुंबईत जो ३॥ लाख रुपयांचा अभूतपूर्व दरोडा पडला त्याच्या तपासांतील अखेरचं पर्व. या भरदिवसा पडलेल्या धाडसी दरोड्यानें अखिल मुंबापुरी चकित झाली होती. कारण इतक्या सफाईनें आणि धाडसानें हा दरोडा घालण्यांत आला होता कीं त्यामुळें पोलिसांची मति गुंग झाली होती. कुणा अस्सल पटाईत बदमाषांखेरीज हें दुसऱ्या कुणाचं काम नाहीं अशी सर्वांचीच खात्री झाली होती.

१० जानेवारी १९४९ ची गोष्ट. सकाळीं सात वाजतां पोलिस कचेरींतील टेलीफोन खणखणूं लागला. एका पोलिसानें टेलीफोन उचलला.

" दरोडा पडला ! लाखों रुपये गेले ! टाटांचे ! "

" कुठं पडला ? "

" ब्रुस स्ट्रीट बॉंबे हाऊस "

" आम्ही निघालोंच तिकडे "

कांहीं मिनिटांच्या आंतच पोलीस तिथं गेले. बॉंबे हाऊसच्या पोर्चमध्यें एक रिकामी ट्रंक पडली होती. चार भयभीत हमाल आणि टाटा मिल्सचा इन्व्हाईस क्लार्क सुरती हा तिथं बेशुद्ध पडायचा काय तो बाकी राहिला होता. त्यांचे पोलिसांनीं जे जाबजबाब घेतले त्यावरून खालील माहिती मिळाली.

१० जानेवारीला म्हणजे ज्या दिवशीं ही घटना घडली तो दिवस म्हणजे टाटा फर्मचा पगाराचा दिवस. नेहमींची प्रथा अशी कीं प्रत्येक महिन्याच्या दहा-तारखेस बॉम्बे हाऊसमधून एक लॉरी पैसे घेऊन निघते आणि शहरांतील टाटांच्या निरनिराळ्या कारखान्यांत पगार वाटला जातो. गुन्हेगारांना ही गोष्ट माहित होती. त्या दिवशीं सुरती हे बॉम्बे हाऊसच्या पहिल्या मजल्यावर गेले. त्यांच्या मागोमाग चार हमाल आणि एक असिस्टंट होता. पगाराची रक्कम ७ जानेवारीलाच रिझर्व्ह बँकेंतून काढली होती आणि बॉम्बे हाऊस मध्यें सेफ डिपॉझिट व्हॉल्टमध्यें ठेवली होती. नोटांच्या बंडलांवर रिझर्व्ह बँकेच्या खुणा होत्या.



## १८ गुणांचा खंडोबा

अठरा हा आंकडा आपण दिवसांतून कितरांदा उच्चारीत असूं आणि पन्नासवेळां लिहीत असूं; पण त्याच्यामागील वैशिष्ट्यें कितीजणांना माहित आहेत ? हा आंकडा आपल्याला वाटतो व दिसतो तितका साधा नाहीं. मोठा बहात्तर लक्षणी आहे. जसा नाशिककर हा ' काशीकरापेक्षां ' शंभर पटीनें वरचढ तसा हा सोळा गुणांच्यावर कडी करणारा अठरा गुणांचा खंडोबा आहे. एक प्रकारचं सांस्कृतिक स्वरूप प्राप्त करून बसला आहे—

( १ ) अठरा—एक संख्याविशेष; १८

( २ ) पुराण—प्राचीन इतिहासपर व चरित्रपर काव्यग्रंथ, यांत सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, लय, देव-दानव, राजर्षि इ० च्या कथा, पराक्रमांचीं वर्णनें, वंशावळी इ. माहिती असते. पुराणें म्हणजे पांचवा वेद म्हणण्याचा जुना प्रघात आहे. हें धार्मिक वाङ्मय समजलें जातें. ही पुराणें अठरा आहेत—( १ ) ब्रह्म ( २ ) पद्म ( ३ ) विष्णू ( ४ ) वायु किंवा शिव ( ५ ) लिंग ( ६ ) गरुड ( ७ ) नारद ( ८ ) भागवत ( ९ ) अग्नि ( १० ) स्कंद ( ११ ) भविष्य ( १२ ) ब्रह्मवैवर्त ( १३ ) मार्कंडेय ( १४ ) वामन ( १५ ) वराह ( १६ ) मत्स्य ( १७ ) कूर्म ( १८ ) ब्रह्मांड.

' अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें । ( ज्ञानेश्वरी १·५ )

( ३ ) उपपुराणें—या मुख्य अठरा पुराणांखेरीज इतर जीं गौण-पुराणें तींहि अठराच आहेत तीं अशीं—लघुकालिका, बृहत्कालिका, पराशर, सिंह, नारद, सनत्कुमार, सौर, दुर्वास, कपिल, मानव, विष्णुधर्मोत्तर, शैवधर्म, माहेश्वर, नंदी, कुमार, औशनस, देवी आणि वरुण. याहून कांहीं वेगळ्याहि याद्या सांपडतात.

( ४ ) अखाडे—म्हणजे संप्रदाय. गोसाव्यांचे पुढील अठरा अखाडे किंवा मठ आहेत—अघोरी, अरण्यअवधूत, आनंद, आश्रम, इंद्र, उदासी, कानफाट्या, कालवेला, गोदड, गोरखपंथी अथवा गोरखनाथी, डंवरा, नंगागिरी, निरंजनी, निर्वाणी, पुरी, भराडी, भारती, रावळ ( वन, सरभंगी, पर्वत, सागर, तीर्थ, सरस्वती—अशीहि कांहीं नांवें जोडीला आहेत. )

( ५ ) पर्वें—महाभारताचीं मुख्य प्रकरणें अठरा आहेत—

आदि, सभा, वन, विराट, उद्योग, भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य, सौप्तिक, स्त्री, शांति, अनुशासन, अश्वमेध, आश्रमवासी, मौसल महाप्रस्थानक व स्वर्गारोहण.











अनुक्रमणिका

(६) [अठरा] अक्षौणी—एकावर एकवीस शून्यें दिली असतां होणारी संख्या. कौरव-पांडवांचें रणसंगरीं लढलेलें सैन्य अठरा अक्षौणी होतें.

(७) अठरा पद्मं वानर—पद्म म्हणजे एकावर बारा पूज्यें असणारी संख्या; शतकोटी. रावणयुद्धाचेवेळीं प्रभू रामचन्द्रांना मदत करणारीं अशीं अठरा पद्मं वानरें होतीं.

(८) अठरा तत्त्वें—महान् (बुद्धि), अहंकार, मन, दहा इंद्रियें आणि पंचतन्मात्रें.

(९) वर्ण—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, कुंभार, गवळी, तेली, पांचाळ, (सोनार, सुतार, लोहार, तांबट, पाथरवट हे पांच मिळून); कोष्टी, रंगारी, शिंपी, न्हावी, पारधी, महार, धनगर, परीट, मांग, चांभार. हे अठरा वर्ण होत.

(१०) जाती—याहि अठरा आहेत—कुंभार, तेली, कासार, तांबोळी, न्हावी, परीट, कलाल, कोष्टी, झारा (झारेकरी); महार (चांभार), जैन, जेती, दुंडे, गुजर, मारवाडी, सोनार, सुतार, हलालखोर (कसाब).

(११) अठरा उपजाती—भिल्ल, कोळी, अंत्यज, चांडाळ पुल्कस, जिनगर, सलतानगर, चर्मक, डोहर (ढोर), भाट, बुरुड, दांगट, मोचेकरी, खाटिक, लोणारी, कैकाडी.

(१२) अठरा पगड जाती—तांबट, पाथरवट, लोहार, सुतार, सोनार, कासार, कुंभार, देवळक (गुरव), धनगर, गौळी, लाडवाणी, जैन, कोष्टी, साळी, चितारी, माळी तेली, रंगारी. (अठरा धान्यांचें कडबोळें—अनौरस अपत्य; जारज.)

(१३) अठरा मुख्य धान्यें—गहूं, साळ, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लाख, चणा, जवस, मसूर, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सावा, उडीद, चवळी.

(आ) अठरा उपधान्यें—सजगुरा, भादली, वरी, नाचणी, वरग, कांग, खपले गहूं, मका, करडई, राजगिरा, मटकी, पावटा, मूग, वाल, कारळा, देवभात, सातू, अंबाडी. (दुसरी गणना)—सजगुरा, नाचणी, वरी, मका, मटका, राजगिरा, शिरस, पांढरफळी, जिरे, मेथी, वेगुर्बीज, देवभात, कमलबीज, पाकड, अंबाडी, मेंडीबीज, गोंवारी, कुड्याचें बीज.

(१४) राज्यकारभारांतील खातीं - पूर्वीं हीं सरकारी खातीं कारखाने स्वरूपांत असून त्यांवर स्वतंत्र अधिकारी असत. सर्वांवर खाजगी कारभारी मुख्य असे. हे कारखाने अठरा होते—('त्याच्या अठरा कारखान्यांच्या गेल्या कळा।'—हे. गो. १४२)—

उष्टर, श्रुत, जनान, जवाहीर, जामदार, शिकार, तालीम, तोफ, शत्री, दफतर, दारा, दिवान, नगार, पील, फरास, बंदी, मोदी व शिकमखाना. (आ) तोफ, पील, उष्टर, फरास, शिकार, रथ, जामदार, जेवाहीर, जिराईत, नगार, दारु, वैद्य, लकड, इमारती, मुदबख, कुणबिणा, खजिना यष्टी- (इ) खजिना, दफतर, जामदार, पीलखाना, राईत, अंबर, फरास, मुदबख, नगार, सरबत, आबदार, शिकार, तालीम, दारू, उंट, बकरे, तोफ, सरंजाम. अशा तीन निरनिराळ्या याद्या सांपडतात.

सकाळीं ६॥ वाजतां कंपनीची लॉरी पोर्चमध्यें अशा तऱ्हेनें उभी करण्यांत आली होती कीं त्यामुळें आंत ट्रंका चढवणं सुलभ जावं. पहांटेची वेळ असल्यामुळें सारं कसं शांत होतं. रस्त्यावर रहदारी तर नव्हतीच. लॉरीचा ड्रायव्हर आंत आपल्या ड्रायव्हरच्या जागेवर बसला होता. मुरती आणि त्याचे सहाय्यक वर गेले आणि त्यांनीं सर्व रक्कम ट्रंकेंत भरून चारहि ट्रंका मजुराच्या बरोबर खालीं पाठवल्या. पोर्चमध्यें एक बिनहत्यारी वॉचमन उभा होता.

हमालांनीं लॉरींत तीन टंका चढवल्या आणि आतां चौथी ट्रंक घेऊन एक हमाल लॉरीजवळ येत होता. इतक्यांत लॉरीजवळ एक मोटार आली. त्यांतून क्षणार्धांत कांहीं लोक खालीं उतरले आणि त्यांनीं आपलीं पिस्तुलें हमालावर रोखलीं. त्यांची तर बोबडीच वळली. चौथा हमाल जो ट्रंक घेऊन येत होता त्याची तर इतकी घाबरगुंडी उडाली कीं त्याच्या हातांतली ट्रंक खाली पडली आणि तिचं झांकण उघडलं. चोरट्यांनीं डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच लॉरींतल्या तीन ट्रंका मोटारींत घातल्या आणि चौथ्या ट्रंकेंतील नोटांच्या पिशव्या तशाच उचलल्या आणि मोटारींत टाकून ते हा हां म्हणतां अपोलो स्ट्रीटच्या दिशेनें पसार झाले.

खरोखरच एवढा अतर्क्य आणि मति गुंग करणारा दरोडा मुंबईशहराच्या इतिहासांत क्वचितच घडला असेल. त्या बिचाऱ्या हमालांच्या तोंडून एक शब्दहि उमटत नव्हता. आणि त्यामुळें ते दरोडेखोर होते कसे, त्यांच्या गाडीचा नंबर, रंग, याबाबत

(१५) अठरा टोपकर—हिंदुस्थानांत आलेले युरोपियन आपल्या निरनिराळ्या देशरिवाजांप्रमाणें टोप्या वापरीत; तेव्हां त्यांना 'टोपकर' असें नांव पडलं. हे 'टोपकर' अठरा प्रकारचे होते. या सर्वांनीं हिंदुस्थानला 'टोपी' घातली—

(१) फिरंगी (पोर्तुगीज); (२) वलंदेज (हॉलंड-डच); (३) निविशियान (नॉर्वेजियन); (४) यप्रदोर (?); (५) ग्रेग (ग्रीक); (६) खतार (?); (७) लतियान (लॅटिन); (८) यहुदिन (ज्यू); (९) इंगरे (इंग्रज); (१०) फरासीस (फ्रेंच); (११) कसनल्यान (शेटलंडियन-केल्टिक ?) (१२) विनेज (व्हेनेशियन); (१३) दिनमार्क (डेन्मार्क); (१४) उरुस (आयरिश किंवा रशियन); (१५) समियान (रोमन); (१६) तलियान (इटालियन); (१७) सुवेस (स्विस); (१८) प्रेमरयान (पोमेरेनियन).

(१६) अठरा भार वनस्पति—पृथ्वीवरील सर्व वृक्ष, वनस्पति यांचा समुदाय. 'अठराभार वनस्पतींची लेखणी।' (व्यंकटेश स्तोत्र ३१)

(१७) अठरा विसवे (विश्वे) दारिद्र्य—अतिशय गरीबी. (एक वाक्प्रचार) (अठरा विसा; वीस विसवा एक टक्का; अठरा विसवे म्हणजे दोन विसवा कमी इतकें; बहुतेक पूर्ण.)

(१८) अठरा चाबू—लफंगे, लुच्चा लोकांची टोळी; अव्यवस्थित लोकांचें मंडळ, बारभाई. (सव खात्यांतील हलक्या कारकून वर्ग.)

पद्माकर गोवईकर

• • •







अनुक्रमणिका

त्यांना कांहींच सांगतां येईना. आणि त्यामुळें त्यांनीं जी माहिती दिली तिचा कांहींच उपयोग नव्हता. विद्युल्लतेप्रमाणें चपळाईनें हा गुन्हा घडला असला तरी गुन्ह्याचा तपास लावण्यापुरता कांहींतरी पुरावा आपल्या हातीं येईल अशी पोलिसांना आशा होती. आजूबाजूच्या लोकांना त्यांनीं छेडलं आणि कुणी तरी म्हणालं कीं मोटारीचा सुरवातीचा नंबर ७ असावा अशी माहिती दिली. या माहितीचा तसा उपयोग नव्हता. पण पोलिसांनीं जागोजाग ७ हा सुरवातीचा नंबर असलेल्या सर्व गाड्या थांबवल्या, त्यांची झडती घेतली पण कांहींच उपयोग झाला नाहीं.

कांहीं निवडक पोलिस अधिकारी डोळ्यांत तेल घालून गुन्ह्याचा बारकाईनें तपास करीत होते. मुंबईतील रस्तान् रस्ता आणि गल्ली-बोळ धुंडाळले पण कांहींच उपयोग झाला नाहीं. गुन्ह्यासाठीं वापरण्यांत आलेली मोटार आणि गुन्हेगार यांचा कांहींच छडा लागला नाहीं. असा दरोडा पडला हीच गोष्ट बनावट आहे असें अनेकांना वाटलें. कंपनीतल्याच माणसानें बातमी दिली असावी असा अनेकांचा संशय आणि त्यामुळें सुर्तीवर संशय होताच.

इतके दिवस धडपड करून कांहींच पत्ता लागेना तेव्हां पोलिसांची खात्री पटली कीं हे गुन्हेगार कुणी तरी अट्टल असावेत. इतका बेमालूम गुन्हा फारां दिवसांत घडला नाहीं. त्यांनीं सर्व गुन्हेगारांच्या याद्या तपासल्या, समोर असलेल्या पुराव्याची छाननी केली पण छे ! ब्रुस स्ट्रीट म्हणजे फ्लोरा फाऊंटनजवळ वेस्टएंड वॉच कंपनीला लागून असलेली गल्ली. त्या भागांत सगळी ऑफीसं असल्यामुळं कुणी राहात असे फारसे नव्हतेच. त्या ठिकाणीं सर्वसाधारणपणें सकाळीं ९ ला रहदारी सुरू होते. त्यामुळें पहांटेचा हा गुन्हा पाहाणारा एखादा कुणी असणं अशक्य होतं. मुंबईत दुधवाल्याखेरीज इतक्या पहांटे कोण येतं ? पोलिसांना विचारच पडला. गुन्हा जसा घडला तसा त्याचवेळीं त्याठिकाणीं गुन्ह्याची तालीम करून पाहायची आणि कांहीं धागा सांपडतो कां हें पहायचं असं पोलिसांनीं ठरवलं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं गुन्ह्याच्या जागीं पोलिस गेले, आणि बरोबर गुन्हा घडला त्यावेळीं एक महादेव कदम नांवाचा, वृत्तपत्रविक्रेता पोऱ्या पेपर वाटीत चालला होता. रोज सकाळीं या भागांत पेपर वांटणें हा महादेवचा नित्याचा क्रम आणि कर्मधर्मसंयोगानें गुन्ह्याच्या दिवशीं त्याच वेळीं तो तेथून पेपर वाटीत चालला होता. तूं गुन्हा घडतांना प्रत्यक्ष पाहिलंस कां, असं पोलिसांनीं त्याला विचारलं. अर्थात् त्याने हा प्रकार प्रत्यक्ष पाहिला होता. उलट आपल्याला कोणीच कसं विचारीत नाहीं याचा त्याला अचंबा वाटला होता. त्यानें गुन्ह्याचं साग्रसंगीत वर्णन केलं. गाडीचा रंग कसला होता हेंहि सांगितलं आणि गुन्हेगारांचं थोडंबहुत वर्णनहि केलं. त्याची साक्ष या गुन्ह्यांतील सर्वांत विश्वसनीय होती.

पण याहिपेक्षां बळकट असा धागा अचानक पोलिसांच्या हातीं आला. १५ जानेवारी १९४९ रोजीं सकाळीं मुंबई सी. आय. डी. कचेरींत भायखळ्याचा एक कातड्याचा व्यापारी ॲडव्होकेट जनरल सी. के. दफ्तरी यांचें ओळखपत्र घेऊन आला. या गृहस्थानें जे सांगितलं तें फार चमत्कारिक होतं. त्या दिवशीं सकाळीं टेनीसचा

खेळ खेळून तो आपल्या फ्लॅटवर परत गेला असतां त्याच्या बेडरूमच्या खोलीजवळ एका टॉवेलमध्यें गुंडाळलेलं बंडल पडलं होतं. त्या बंडलांत नोटांची पुडकीं होतीं आणि उर्दूमध्यें खरडलेली एक चिठी होती. त्या चिठींत असं लिहिलेलं होतं कीं हे पैसे आपल्या नोकरींत पूर्वी असलेल्या नूरमहंमद या क्लीनरला पोचते करावेत.

या पुराव्याचा कांहींच उपयोग नव्हता. कारण नूरमहंमद हा त्यावेळीं आर्थर रोड जेलमध्ये अंडरट्रायल प्रिझनर म्हणून होता. आणि त्याचा भाऊ शेरमहंमद दिल हा २१ ऑक्टोबर १९४८ रोजीं पोलिस कष्टडींतून निसटला होता. हबीब बँक दरोडा प्रकरणीं त्याला मुंबई हायकोर्टानें सात वर्षाची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावली होती. त्याच्या पलायनाला नूरमहंमदनें मदत केली होती आणि म्हणूनच त्याबद्दल त्याला आर्थररोड तुरुंगांत ठेवण्यांत आलं होतं.

पोलिसांनीं त्या नोटांचीं बंडलें ताब्यांत घेतली. एकूण ३६,६३० रु. होते. पण आतां मात्र पोलिसांची खात्री झाली कीं शेरमहंमद शेरदिल या अवघ्या २२ वर्षाच्या जवानानेंच हें धाडस केलं असावं.

पोलिसांच्या ताब्यांत आलेले ३६ हजार रुपये नक्कीच त्या लुटीतला भाग होता. त्याच्यावर रिझर्व्ह बँकेच्या खुणा होत्या. आतां शेरमहंमदचा तपास लावणं हें पहिलं काम. पण शेरमहंमदशिवाय आणखी कोण कोण लोक या ' धंद्यांत ' होते याचा तपास लावण्याचं काम त्याहून अवघड होतं. शिवाय दरोडेखोरांनीं कोणती गाडी वापरली हेंहि पोलिसांना कळत नव्हतं. वास्तविक पाहातां अशा गुन्ह्यांत गाडीचा ठावठिकाणा लपवून ठेवणं कठिण असतं, पण या गुन्ह्यांत गाडीनेंच अधिक बुचकळ्यांत पाडलें.

१० जानेवारी १९४९ रोजीं म्हणजे गुन्हा घडल्यानंतर अवघ्या आठवड्यानें पोलिसांना अशी बातमी लागली कीं गोवालिया टँक येथें राहाणाऱ्या दोन पार्शी तरुणांनीं एका ख्रिश्चनाकडून कांहीं ' पैसे ' उपटण्याचा प्रयत्न केला. आणि हा ख्रिश्चन दरोड्यांत सामील असावा असा पोलिसांचा तर्क. सुपरिंटेंडंट परांजपे आणि इन्स्पेक्टर सामी यांनीं स्वतःजवळ असलेल्या गुप्त माहितीच्या आधारें या पार्शी तरुणाचा शोध लावला. त्याचं नाव फली. त्या रात्रीं पोलिसांनीं फलीला खूप छेडलं. सकाळीं ४॥ वाजतां फली पोलिसांना नेपीअन सी रोडवर राहाणाऱ्या लारी पिंटो नांवाच्या माणसाच्या घरीं घेऊन गेला. लारी त्यावेळीं आपल्या घरांत दारू पिऊन तर्र झोपला होता. त्याच्या खोलींत चार जिवंत काडतुसं आणि फली दुबाष नांवाच्या माणसानें लिहिलेलं धमकीचं पत्र होतं. अर्थात् हा फली म्हणजे गोवालिया टँक वरचाच फली. पोलिसांनीं लारीला अटक केली आणि त्याला खूप छेडलं. त्यानं दिलेल्या माहितीवरून पोलिसांनीं धोबीतलाव जवळच्या हॉटेल मिराटोल येथें राहाणाऱ्या एअर इंडिया मधील श्री मुकुंद या फ्लाइट नॅव्हीगेटरची गांठ घेतली. त्यानें असें सांगितलें कीं हा लारी पिंटो आणि त्याचा जिमी नांवाचा मित्र आपल्याकडे वारंवार येत असत आणि एका रात्रीं तर जिमी त्या हॉटेलांत राहिला होता. हा जिमी म्हणजे दुसरं तिसरं कोणी नसून शेरमहंमदच होता. ' जिमी ' त्याच्याकडे राहून गेल्यानंतर दुसरे दिवशीं सकाळीं आपल्या खोलींत एक पिस्तुल कसे सांपडलें याचीहि त्यानें माहिती दिली. मुकुंदच्या नोकरानें साक्ष दिली कीं हें पिस्तूल लारीच्या कोटाच्या खिशांतून पडलं.

तें पिस्तूल पाहून आपण थोडे घाबरलों आणि लागलीच तें पिस्तुल मरीन ड्राईव्हच्या समुद्रांत फेंकून दिलं, असं त्यानें सांगितलं. पोलिसांनीं समुद्राच्या तळाशीं तपास करून तें पिस्तूल मिळवलं. त्या पिस्तुलांत पांच काडतुसं होतीं. आणि जेव्हां दरोडेखोरांनीं पाहिलं कीं पिस्तुलं दाखवूनच काम होतंय तर उगाच तीं उडवून आवाज कशाला करा म्हणून त्यांनीं त्याचा उपयोगच केला नाहीं. तज्ज्ञांनीं तें पिस्तुल तपासलं. आणि तें चालू असल्याचा दाखला दिला. मुकुंदचा मित्र डी. अँब्रु यानें लारी पिण्टोनें त्याच्याकडे ठेवायला दिलेले ८०० रुपये पोलिसांच्या हवालीं केले. लारी माणसं जोडण्यांत पटाईत आणि त्यानें एका नृत्यप्रसंगीं या दोघांची मैत्री केली. लारी पिंटोनें मलबार हिलवर राहाणाऱ्या आपल्या एका मित्राकडून एका कातडी बॅगेंत ठेवलेले ४७००० रु. पोलिसांना दिले. ही रक्कम त्याला दरोड्यांतली भागी म्हणून मिळाली होती. इतकं करूनहि गाडी आणि इतर आसामींचा पत्ता लागायचा होताच.

१९ जानेवारीला महत्त्वाची माहिती क्रॉफर्ड मार्केटमधील एका मोडविक्याकडे मिळाली. त्या माहितीच्या आधारें २० तारखेला सकाळीं एका पठाण तरुणाला अटक करण्यांत आली. त्याची झडती घेतली असतां त्याच्याकडे १५३४ रुपये सांपडले. ही रक्कम त्यानें त्याच्याकडे दिली होती त्या सय्यद नझीरखानला बॉम्बे सेंट्रलला पोलिसांनीं पकडलें. त्याच्याकडे १३००० रुपये मिळाले.

लारी पिंटोनें पोलिसांना आणखी कांहीं माहिती दिली. दरोड्यानंतर अवघ्या पांच दिवसांनीं धनजी शाह जीवनजी या इसमानें आपल्या मुलाकडून पैसे घेऊन एक मोटार विकत घेतली. या मुलाचें नांव रुस्तम आणि त्यानें या दरोड्यांत भाग घेतला होता. या कटांतील आणखी एक भागीदार कावस इराणी याचीहि लारीनें माहिती दिली. कावस इराणीनें नुकतंच लग्न केलं होतं आणि लारीच्या अटकेनंतर थोड्याच दिवसांत आपला मधुचंद्र साजरा करण्यासाठीं तो सुरतेला पळाला होता. २२ जानेवारीला तो मुंबईला परत आला आणि पोलिसांच्या स्वाधीन झाला. कावस इराणीच्या जबानीच्या आधारें पोलिसांनीं रुस्तम धनजी शाह याला अटक केली. पोलिसांनीं त्याच्या बापाचा पत्ता लावला आणि त्यानें घेतलेली गाडीहि ताब्यांत घेतली. कावस इराणीच्या जबानीवरून असें स्पष्ट झालें कीं शेर महमंदचा एक साथीदार शमसूर रहमान याच्याकडून त्याला तीस हजार रुपये मिळाले. कावस इराणीनें दरोड्याची साग्रसंगीत हकीकत पोलिसांना ऐकवली आणि त्यानेंच त्यांना त्या ठिकाणीं नेऊन योग्य वेळीं काम करण्याचा इशारा दिला होता. कारवार स्ट्रीटवरील वॉर्डन नांवाच्या एका ट्रेन एक्झामिनरचा पत्ता लागला. त्याची माहिती कावस इराणीनेंच दिली. रुस्तम आणि कावस यांनीं शेरमहंमदची आणि वार्डनची ओळख करून दिली. जोआकिम या नांवानें शेरमहंमद वार्डनेकडे दरोड्यानंतर कांहीं दिवस राहिला होता. कावस इराणीनें जोआकीम ऊर्फ शेरमहंमदला एक बेडिंग आणि कांहीं कपडे विकत आणून दिले. ह्या सर्व वस्तु आणि त्यांची पावतीहि पोलिसांच्या हातीं मिळाली.

दरोड्याच्या वेळीं ट्रंका उचलतांना शेरमहंमदच्या हाताला थोडी जखमहि झाली होती. वार्डननें त्याला यासंबंधी विचारलें असतां आपल्याला कुत्रा चावला असें त्यानें सांगितलें. शेरमहंमद त्याच्याकडे दोन दिवस राहिला आणि त्याचा फोटो जेव्हां पोलिसांनीं त्याला दाखवला तेव्हां आपल्याकडे राहिलेला जोआकीम तो हाच असें त्यानें ओळखलें. जोआकीमकडे भरलेलं पिस्तूल होतं असेंहि त्यानें पोलिसांना सांगितलें. रुस्तम आणि कावस यानाहि त्यानें ओळखलें. जोआकीमनें आपले राहण्याजेवण्याचे १५० रु. जे दिले ते वार्डननें पोलिसांना दिले.

एवढ्या अवधींत पोलिसांनीं लारी पिंटो, कावस इराणी आणि रुस्तम यांना अटकेंत ठेवलेंच. आणि एकूण ८० हजार रुपये त्यांना परत मिळाले. टाटाकडील एका बडतर्फ नोकरानें या लोकांना ही माहिती दिली आणि त्याच्या आधारें बॉम्बे सेंट्रल स्टेशनजवळच्या एका हॉटेलांत बसून त्यांनीं गुन्ह्याचा मनसुबा रचला.

आतां फक्त दोनच गुन्हेगार पकडायचे राहिले होते. शेरमहंमद आणि त्याचा साथीदार शमसूरखान. त्यापैकीं शमसूरखानाला पोलिसांनीं घाटकोपरला एका चाळींत मोठ्या शिताफीनें पकडला. सुरवातीला शमसूर कालिना येथें राहात होता तेथून तो घाटकोपरला राहायला गेला. तेव्हां कालिनाच्याच एका माणसाला पोलिसांनीं गांठलें. त्याच्याकडून शमसूर घाटकोपर बमारच्या मागें राहातो असें कळलें. पोलिस तेंथें गेले आणि एका पठाण पोरानें त्यांना शमसूरची खोली दाखवली. या खोलीला पोलिसांनीं वेढा दिला. शमसूर खाटेवर झोंपला होता. पोलिसांना पाहातांच त्यानें पळून जाण्याचा निकराचा प्रयत्न केला. तरीपण पोलिसांनीं त्याला चतुर्भुज केलें. पकडल्यावर त्यानें आपलें नांव अबदुल्ला असें सांगितलें आणि ३१० रुपये पोलिसांच्या हवाली केले. शमसूरखान हा वायव्यसरहद्दचा लोदी पठाण. तो मॅट्रिकची परीक्षा पास झालेला आणि युद्धकाळांत त्यानें मुंबईच्या ए. आर. पी. मध्यें कामहि केलेलें होतें. आपण शेरमहंमद, कावस आणि रुस्तम यांच्या साहाय्यानें दरोड्याचा मनसुबा रचला हें त्यानें कबूल केलें. दरोड्यानंतर त्यानें वरळी येथें राहाणाऱ्या सुलेमान नांवाच्या आपल्या मित्राकडे २८००० रुपये ठेवले

शमसूर रहिमाननें कावस इराणीनें उसने दिलेले बूट पायांत घातले होते. शमसूरच्या साहाय्यानें आणखी कांहीं इसमाकडून बरीच रकम पोलिसांनीं गोळा केली. याशिवाय डंकन रोडवरच्या एका खोलींतील एक भरलेलें पिस्तूल आणि चार काडतुसें पोलिसांनीं जप्त केली. पण इतकं करून मोटारीचा आणि कटाचे इतर धागेदोरे पोलिसांच्या हातीं येईनात.

**पोलिसांनीं शमसूरला खूप छेडलं. पण तो ३० जानेवारी १९५९ पर्यंत पोलिसांना क्षाद देईना. ३० जानेवारी १९४२ ही गांधींची पहिली पुण्यतिथी. त्या दिवशीं संध्याकाळीं त्याचं अंतःकरण विचलित झालं आणि त्यानें पुढील कबुली जबाब दिला—**

**"मी माझ्या कृत्याचा सारखा विचार करतोंय आज महात्मा गांधींच्या पहिल्या पुण्यतिथीच्या दिवशीं तर**



अनुक्रमणिका

**माझं मन अधिकच विचार करूं लागलं. मी अशा तऱ्हेचा गुन्हेगार व्हावं याचं मला फार दुःख होतंय. म. गांधींनीं माझ्यासारख्या लोकांकरितां प्राण दिले. आतांपर्यंत मी कांहीं खऱ्या गोष्टी लपवून ठेवल्या,**

दरोड्यांत वापरलेली गाडी हायकोर्टाच्या गॅरेजमध्यें ठेवलेली आहे हें मला शेरमहंमदनें सांगितलें. नेपीयन सी रोडवर राहाणारा त्या गाडीचा ड्रायव्हर मी तुम्हांला दाखवूं शकेन. या ड्रायव्हरला तीस हजार रुपये दिले, ते गाडी वापरायला दिल्याबद्दल. ''

दरोड्यासाठीं B M W 7466 ही गाडी वापरण्यांत आली होती. आणि ती एका हायकोर्ट जज्जची होती. गाडीचा ड्रायव्हर जॉन यानें ती शेरमहंमदला वापरायला दिली. अर्थात् याचा गाडीच्या मालकाला कांहींच पत्ता नव्हता. फक्त दरोडेखोरांनीं त्यांतील पहिल्या आठाचे सहा केले. लारी पिंटोच्या अटकेपूर्वी गाडीचा ड्रायव्हर जॉन हा तीस हजार रुपये घेऊन कुठें नापत्ता झाला. जॉन आणि लारी पिंटोची पूर्वीची ओळख होतीच.

यानंतर शेरमहंमदचा पत्ता लावणं अवघड नव्हतं. तो पाकिस्तानांत गेल्याचें कळलें. हेडकॉन्स्टेबल फाझल हुसेननें पाकिस्तान पोलिसांच्या साहाय्यानें शेरमहंमदला मोठ्या नाट्यपूर्ण रीतीनें पकडलें. मात्र लुटीचा फार मोठा भाग शेरमहंमद पाकिस्तानमध्यें घेऊन गेला त्याचा कुणाला थांगपत्ताहि लागला नाहीं. २९ जुलै १९५० ला या दरोड्याच्या नाटकाचा अखेरचा अंक. युनिव्हर्सिटी सेशन्स कोर्टाचे ॲडिशनल जज्ज श्री. भट यांनीं या खटल्यांत एकूण ८० साक्षीदारांच्या जबान्या घेतल्या. कावस माफीचा साक्षीदार झाला. शेरमहंमद हा दोषी ठरला आणि त्याला १२ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली. लारी पिंटो आणि रुस्तम यांना ९ वर्षे सक्तमजुरी शिक्षा झाली. व शमसुरला आठ वर्षे सक्तमजुरीची शिक्षा झाली.

---



# स्वप्न

—माधव वानिटकर

एखाद्या लांबच्या रस्त्याप्रमाणें अखेर मी शिक्षण संपलें. भाग्यरेखा माझी स्पष्ट होती म्हणून मला नोकरी लागायलाहि फारसा विलंब लागला नाहीं. एका प्रसिद्ध औषधांच्या दुकानांत जमाखर्च लिहिण्याचं काम माझ्याकडे सोपविण्यांत आलं. त्याबद्दल तेव्हां पुरेसा वाटणारा पगारहि मला मिळूं लागला. मी सुखानं दिवस काढूं लागलों. ज्या माझ्या हौशी आणि इच्छा थी ना त्या कारणानं अपुऱ्या राहिल्या होत्या त्या पुऱ्या होतील हेच मी पाहूं लागलों. त्या वेळेची स्वप्नें म्हणजे नक्षत्र लोकाचें पुन्हांपुन्हां होणारे दर्शनच !

अशा त्या खुषीच्या काळांत मला एक दिवस अगदीं वेगळ्या प्रकारचे स्वप्न पडले. आजपर्यंतच्या स्वप्नांसारखें तें स्वप्न गुलाबपाण्यानं भिजून आलें नव्हते किंवा वेणींत मदनबाण खोवूनहि आले नव्हते. त्या स्वप्नावर भीतीच्या छाया पसरल्या होत्या. त्या स्वप्नांत मी सहज समुद्रतीरावरून फिरत असतां एका लाटेनं आंत ओढला गेलो. स्वतःला वांचविण्याची मी शर्थ केली पण त्याचा कांहींहि उपयोग न होतां मी पाण्यांत बुडालों तो बुडालोंच ! अगदीं खोल !

मग दचकून मी जागा झालो आणि तें स्वप्नच होतें हें पाहून मला फार बरें वाटलें.

पण गंमत अशी कीं, लागोपाठ तीन रात्रीं मला हेच स्वप्न पडलं ! मग मात्र मी भयचकित झालो. माझ्या आयुष्यांत असलं विपरीत पहिल्यांदाच घडत होतं. जी स्वप्नं पुन्हां पुन्हां पडावी असं मला वाटलं होतं. त्या स्वप्नांनीं कधीं चुकूनहि माझ्या शयनागारांत पाऊल टाकलं नव्हतं आणि हे नको असलेलं स्वप्न अलिबाबाच्या मानगुटीवर बसलेल्या म्हाताऱ्याप्रमाणें माझ्या कपाळीं येऊन बसलं होतं. ज्या स्वप्नांनी माझ्या पापण्यांवर हिंदोळावं अशी मी इच्छा धरून होतो ती स्वप्नं आतां वाट चुकलेल्या मुसाफिराप्रमाणें कुठेंतरी भटकत होती आणि हें स्वप्न मात्र ओंगळ भिकाऱ्यासारखं पुन्हां पुन्हां नेत्रद्वारीं येत होतं !

तीन वेळां एकच स्वप्न पडल्यावर मी अगदीं घाबरून गेलो. ज्याला त्याला मी या स्वप्नाचा अर्थ विचारूं लागलो. कुणी सांगितलं 'तुझ्यावर संकट येणार आहे !' कुणी सांगितलं, 'तुझे पुष्कळ पैसे खर्च होणार आहेत' तर एकानं सांगितलं, 'बरीच किंमत दिल्यावर एखादी क्षुल्लक वस्तू तुझ्या हाती येणार आहे !' एक तर चक्क म्हणाला 'या स्वप्नाला अर्थ नाहीं !'

पण तिसरे स्वप्न पडल्यावर पंधराच दिवसांनी माझे एका मुलीशीं लग्न ठरलें.

आणि त्या स्वप्नाचा अर्थ मला नीट समजला ! • • •







अनुक्रमणिका

*महाराष्ट्र सरकारच्या प्रसिद्धि खात्यांतील जनतासंपर्काधिकारी श्री. वसंत देशमुख हे नुकतेच परदेशपर्यटन करून आले. या त्यांच्या प्रवासांतील एक मनोरंजक अनुभव—*




**बा**द बाद (Baden Badon) हें पश्चिम जर्मनींतील एक रम्य स्थान आहे. वज्रेश्वरीसारखी गरम पाण्याची कुंडं आहेत इथं ! हिटलरनं बांधलेल्या सुप्रसिद्ध "आटोबान्स" (Autobahns) म्हणजे मोटारींकरितां बांधलेले खास रस्ते पाहून मी थक्क झालों होतों. सरळ, सुरेख, गुळगुळीत—मैलच्या मैल पसरलेले. मोटर भरवेगानं बाद बादच्या रोखानं चालली होती. दुतर्फा वनराजी नेत्रांतला गारवा वाढवीत होती. विचारांचं काहूर माझ्या डोक्यांत थैमान घालीत होतं. जर्मनी ! बलाढ्य जर्मनी ! जगाला धडक देणारा जर्मनी ! हिटलर, हर्मन गोअरिंग, डॉ. गोएब्लस, रिबेनट्रॉप, हिमलर, फिल्ड मार्शल कायटेल, फिल्ड मार्शल रॉमेल फिल्ड मार्शल रुंडस्टेड...अन् इव्हा ब्रॅटन—हिटलरची प्रेयसी...प्रचंड नांवें. आतां त्यांची फक्त स्मृतिच उरली होती. पण ज्या भूमीवरून ह्यांनीं जगाला हिसका दिला त्या भूमीवरून मी चाललों होतों ही जाणिव मला विचित्र संवेदना देत होती.

### घरचा गणपति...

अन् ह्या इथं—आपल्या मायभूमीपासून फार फार दूर मला घरच्या गणपतीची आठवण झाली. घरीं सालाबादप्रमाणं मोरया यायचा होता. मी मात्र नव्हतो. मुंबई सोडतांना व स्वित्झर्लंडहून माझ्या भावास खास पत्र लिहून मी निक्षून बजावलं होतं कीं मी जरी हजर नसलों तरी आपल्या गणपतीची आरास उत्तम करा. सनई चौघडा लावा. हौस करा. संयुक्त महाराष्ट्रांत गणराज प्रथमच येत आहेत रस्त्याच्या बाजूचा दुतर्फा हिरवळ त्यावर लागेल तेवढ्या दूर्वा होत्या. घरी सहस्रनाम झालं असेल काय, उपाध्याय वेळेवर आले असतील काय...

मोटर भर वेगानें जर्मनीच्या उत्कृष्ट रस्त्यावरून चालली होती पण माझं हिंदु मन गणपति बाप्पाच्या दूर्वांभंवती घोटाळत होतं.

मला माझं बालपण आठवलं ! केवढ्या अमर्याद उत्साहानं आम्हीं मखर बांधायचे ! रात्रभर जागरण ! हौस...प्रचंड हौस. रंगित कागदांच्या झाळ्या कापायच्या–त्या चिकटवायच्या...अन् आमचे वृद्ध काका शमीची पानं आणण्याकरितां कुठं दूर जंगलांत जायचे पण शमी मात्र घेऊन यायचे 'त्याशिवाय पूजा बंद ' सहस्रनाम बंद–भोजन बंद !

ह्यावेळचा गणपति कसा बरं असेल ? माझं मन आसुसलं–गणपति पहाण्याकरितां. कसा दिसणार ?

### गणपतिदर्शन !

अन् काय सांगू तुम्हांला ! बाद बादच्या रस्त्यावर अन् मोटारांतच गणपतिचं आकस्मिकपणें दर्शन झालं. कसं ? माझ्या बाजूला छोटी बॅग होती. त्याच्यांतून वरची पुस्तिका काढली. एअर इंडियाचं टाईमटेबल होतं तें. त्यावर गणपतिच चित्र व वर "श्रीगणेशाय नमः" हें छापलं होतं. मला आश्चर्याचा





अनुक्रमणिका

धक्का बसला व अत्यंत आनंद वाटला मला ! जर्मनीत बुद्धिदात्या विनायकाचं दर्शन ही एक अजब घटना घडली खरी !

अन् बोलतां बोलतां मी बाद बादला आलो. हॉटेल बेलव्ह्यू (Bellevue) हें एक राजविलासी हॉटेल आहे—हॉटेल कसलं प्रासादच तो !

माझी खोली—उत्तम सजविलेली होती. परीटघडीचं कडक बिछाना व अनेक टॉवेल्स सर्व कांहीं चकचकीत. हॉटेल भंवती एक सुंदर वाटिका व फुलबाग होती. फार मोठमोठा मंडळी कुठलीच विवंचना नसल्यामुळं उगाचच गंभीर चेहरा करून बसली होती. कारण इथं सगळं हळूं ! बोलायचं हळूं ! चालायचं हळूं—म्हणजे चालायचं वेगांत पण आवाज न करितां. गोंगाट नाहीं. गडबड नाहीं...शांत—जिकडं तिकडं शांत......

### आणखी एक विराट दर्शन...

पण ह्या शांततेचाहि भंग झाला. पांच सात माणसं हॉटेलबाहेरच्या बागेंत जरा गडबडीनंच धांवत आली. एवढा गोंधळ म्हणजे कांहीतरी विशेष आहे म्हणून मी पण बाहेर आलों. पहातों तो सर्व अस्मानाकडं पहात होते. ८ वाजून १२ मिनिटांनीं—आतां दिसलच. मनगटावरची घड्याळं चकचकत होतीं. तो पहा ! तो पहा...मी पाहिलं अन् खरोखरीच दिङ्मूढ झालों. मानवी प्रज्ञेचा सर्वोत्तम विजय माझ्या नजरेसमोरून चालला होता. बरोबर ८–१२ मिनिटांनी अमेरिकेनं सोडलेला दृग्गोचर मी अगदीं स्वच्छ १५ मिनिटांपर्यंत पाहिला. तो ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत जाईपर्यंत मी त्याच्याकडं सारखा टक लावून पहात होतो. नीळसर चांदणी सम मंदगतीनं धांवती असा होता तो स्फुटनिक Bellevue ह्या पिवळ्या अक्षराच्या मागं स्फुटनिक अदृश्य झाला व मी खोलीवर परतलो !

घरीं आरतीची वेळ झाली असेल काय ? आरती होऊन गेली असेल. तो बाहेरचा स्फुटनिक विश्वाची आरती करतोय ! करूं दे लेकाच्याला !

दुसऱ्या दिवशीं श्री. हान्स झायडेल यांना मला भेटावयाचं होतं. जाडजूड व लठ्ठ असे मस्त होते झायडेल म्हणजे—श्रीमती कामे तुम्हांला आमचं स्नानगृह दाखवितील.' इतक्यांत श्रीमती कामे आल्याच !

श्रीमती कामे इंग्रजी उत्कृष्ट बोलत होत्या. त्यानीं शेक्सपीअरचा अभ्यास केला होता. ५३ वर्षाच्या ह्या बाईसाहेब धुण्याच्या कांठीसारख्या ताठ चालत आम्हीं बादबादच्या त्या खास स्नानगृहाकडं गेलों.

### अजस्र स्नानगृह !

स्नानगृहं अजस्र आहे. तिथल्या डायरेक्टरांची व माझी ओळख करून देण्यांत आली. वज्रेश्वरीची कुंडं व राजापूरची गंगा ह्यांची माहिती त्यांना सांगतांच त्यांना फार आश्चर्य वाटलं " तुमचं आमचं स्वस्तिक उलटं असलं तरी पाणी उलटूं शकत नाही " ह्या माझ्या वक्तव्यावर ते मनसोक्त हंसले !

" आता आम्हीं तुम्हांला स्पेशल बाथ " देणार आहोंत. अरेबियाचे राजे इब्न सौद व राजा हेले सेलासी यांना दिला होता हा स्पेशल बाथ. " डायरेक्टर म्हणाले.

" फार मोठा मान आपण मला देत आहांत. " मी सौजन्यानं म्हणालों.

" कसचं कसचं. " वगैरे !

एका मार्गदर्शकानं माझा पासपोर्ट, पैशांचं पाकिट वगैरे एका पोलादी छोट्या पेटींत (locker) ठेवण्यास सांगितलें. तुमचा नं. ३०७ ! ही घ्या चावी ! घेतली—आतां जा आंत. गेलों. तिथं एक जर्मन होता. त्यानं मला दिगंबर होण्यास सांगितलें.

दिगंबरा ! दिगंबरा ! श्रीपादवल्लभ दिगंबरा !!!

आजूबाजूला पांचसात जर्मन हिंडत होते दिगंबर अवस्थेत. एका क्षणाचाहि विलंब न लावतां मी दिगंबर झालों. मी एकदम लहान झाल्यासारखं वाटलं. एवढीं मोठीं, मोठीं माणसं आजूबाजूला वावरत आहेत अन् मी एक छोटा बालक हिंडत आहे असा क्षणभर मला भास झाला. माझी लज्जा कुठं पळाली ? माझ्या अंगावरची वस्त्रं जरासुद्धा बाजूला होत नाहींत ह्यासंबंधी माझी ख्याति आहे. मग माझी लाज कुठं गेली ? कीं कपडे घालणं हें अनैसर्गिक आहे ? अन् असं उघारणं हें नैसर्गिक आहे ?

दुसऱ्या जर्मन माणसानें मला एक मोठा टॅावेल दिला व रबरी पांढऱ्या सपाता दिल्या. त्या घेऊन मी दुसऱ्या खोलींत गेलों. तेथें गरम पाण्याचा फवारा होता. त्याखालीं उभें रहाण्यास मला सांगितलें. इथवर ठीक होतं. दुसरा जर्मन आला तो म्हणाला "ह्या खोलींत दहा मिनिट वाफारा घ्या व त्यानंतर बाजूच्या पांच मिनिटं. " इतकं बोलून तो झटकन् आपल्या कामाला गेला !

मी त्या खोलींत प्रवेश केला. पांच सहा लाकडी खाटा होत्या. त्यावर आरामशीर झोंपता यावे अशी सोय होती. आंत शिरल्याबरोबर वाफेचा गरम भपकारा अंगावर आला. त्या कढत खोलींत त्या भपकाऱ्यांच्या फवाऱ्यांत दहा मिनिटं काढायची होती. पहुडलो त्या लांकडी खाटेवर. अंगाला चटके बसत होते पण करणार काय ? स्पेशल बाथ हवाना ! घ्या लेको ! माझ्या बाजूच्या कॉटवर दोन जर्मन पसरले होते. दोन दोन मिनिटांनी मी भिंतीवरल्या घड्याळाकडे पहात होतों. अंग वाफून निथालं होतं. अजून दुसऱ्या खोलींत पांच मिनिटं काढायची होती. सहा सात मिनिटं झाल्यावर अंगावरचे पाणी वाळले होते व त्यांच्या ऐवजी टपटपीत मोत्याएवढे घर्मबिंदु दृग्गोचर होत होते. इंद्राला सहस्रनेत्र होते म्हणतात. ते कसे दिसले असतील त्याची मला कल्पना आली. मला मजा वाटत होती. सुख वाटत होतं दुःख कसलं ? अन् हे विचार मनांत येताहेत तोंच लाज कुठें पळाली ह्या प्रश्नाचं उत्तर मला आपसूक मिळालं. !

### " यथा जीर्णानि वस्त्राय "......

बस्स ! अहो आमची संस्कृतिच व धर्मच त्यागप्रधान आहे. साहेबाची कांचप्रधान, चमचे काटे प्रधान व ब्रशप्रधान-मध्यपूर्वेंत तंबूप्रधान, उंटप्रधान व सुरीप्रधान तर आमची त्यागप्रधान ! दिगंबर होणं व असणं ही तर आमची नैसर्गिक प्रवृत्ति ! ज्ञानी होऊन आम्ही दिगंबर होतो. नंगा नाच करण्याकरतां नव्हे—तेव्हां त्या प्रवृत्ति माझ्या रोमरोमांत असल्यामुळें एका क्षणाचाहि विलंब न लावतांनां मी कपडे कां काढले व लाजलों कां नाहीं त्याची मला ग्वाही त्या बाष्पपूर्ण खोलींत मिळून धन्य वाटलें ! संपली ती दहा मिनिटं—बाजूच्या खोलींत गेलो इथली उष्णता फारच

( पान ४४ वर )





सौ. नलिनी सुखटणकर

*...आणि त्याच वेळीं वैजयंती भेसूरपणें ओरडत विलक्षण हातवारे करीत धांवत खालीं आली, अगदीं वेडयासारखीं ! नजिकच्या टेबलावरचीं हाताला येईल तीं वस्तु तिनें उचलली, आणि आईच्या तोंडावर फेंकली......*





**वा**ऱ्याची झुळूक शिडांत शिरावी त्याप्रमाणें, हंसाच्या फुललेल्या छातीसारखे दिसणारे विरल पांढरे शुभ्र पडदे, नर्सनें बाजूला सारले, नी सकाळचा कोवळा सूर्यप्रकाश खोलींत खेळूं लागला. जणूं धुक्याचें आवरण दूर झालें, नी बाहेरचा मनोहर देखावा दिसूं लागला. त्याच प्रसन्न आणि नितळ वातावरणाचें प्रतिबिंब आंत उमटलें.

उजेडानें डोळ्यांना हळुवार गुदगुल्या केल्यामुळें, वैजयंतीनें डोळे किलकिले करून सभोंवतीं पाहिलें. टेबलावरच्या उंच फुलदाणींत, तीहूनहि उंच लांबसडक देठांचीं ग्लॅडिओलायचीं फुलें हसत होतीं. गुलछड्या छमछम करत लवत होत्या ! थोडेंच सामानसुमान, भिंतींना निळा रंग, पांढरा टेबलक्लॉथ–चादरी, टुवाल-नॅपकीन, सफेद झुलणारे डौलदार पडदे, आणि पांढऱ्याशुभ्र वेषांतील, हिरकण्यांसारख्या दातांची चमक दाखवणारी सुहास्यमुद्रा नर्स...जणूं दुधावरच्या साईचा शिडकावच तिथें झाला होता ! पावडरची भुकटी लवंडली होती !

साऱ्या वस्तू नी वातावरण डोळ्यांत साठवून घेण्यास, दुबळ्या झालेल्या वैजयंतीला जरा वेळ लागला ! त्या मनाला बसलेल्या धक्क्यां तून, त्यानंतरच्या बेशुद्धींतून व त्या बेशुद्धींत दिसलेल्या भयंकर स्वप्नांतून आतां पहिल्यांदाच ती कुठं जागी होत होती ! बाहेरच्या जगाशीं समरस होण्याच्या आड तो चेहरा येत होता—काळें कोड झाल्याप्रमाणें काळाकुट्ट भयानक दिसणारा हिडीस चेहरा आणि त्यांतून चमकणारे अंगाराप्रमाणें असलेले तांबडेलाल किळस आणणारे डोळे...तिनें भीतीनें फोडलेली किंकाळी...

आतांहि ती किंकाळी वैजयंतीच्या घशांत घुटमळली. मोठ्या प्रयासानें तिनें ती गुदमरवून टाकली ! उलटीची भावना झाली ती दाबत, शहारलेलें अंग गादीच्या उबंत स्थिरावून, नी जारीनें बाहेरच्या जगाचा कानोसा घेण्याचा प्रयत्न करत होती, आणि तरीही उकडीच्या करंड्यांत दबलेल्या वाफेसारख्या, तिच्या मनोवृत्तींना आंतल्याआंत उकळ्या फुटत होत्या !

" बरं वाटतं ना आतां ?" नर्सनें सुहास्यवदनाचा साभिप्राय भावाचा ठसा कायम ठेऊन, स्निग्ध स्वरांत प्रश्न केला ! स्पेशल खोलींत दाखल झालेली ही महत्त्वाची केस, तशीच स्पेशल होती हें तिच्या सारख्या तल्लख बुद्धीच्या जाणकार अनुभवी नर्सला कुणी तिऱ्हाइतानें सांगायला नको होतें ! वैजयंतीच्या आईचा, सुमित्रेचा दर्जा आणि श्रीमंती ह्याबद्दल कुणी अज्ञान असणें शक्यच नव्हतें. वैजयंतीच्या गतपित्याचें समाजांतील स्थान सारें शहर जाणून होतें. ते सुप्रसिद्ध सर्जन होते आणि ह्या इस्पितळांतच त्यांनी ऑनररी काम केलें होतें. त्यांच्या स्मृतीला अजूनहि हॉस्पिटल स्टाफ मान देत होता.

नर्सचीं चपल, चलाख आणि तयार बोटें भराभर खोलींतलें काम उरकत होतीं. गादीवरची चादर सारखी करून, उशी फुलवून



अनुक्रमणिका

तिनें वैजयंतीला रेलून बसविलें, आणि चहाचा ट्रे पुढें केला "हा चहा!" वैजयंतीकडे अनुकंपेनें पहात नी उगाचच बोलायचें म्हणून बोलली, "थोड्यावेळानं नास्ता घेणार ना?"

"नको!" वैजयंतीनें क्षीण स्वरांत उत्तर दिलें. "भूक नाहीं!" तिनें चहाचा एक घोट घेतला, तो तिला अगदींच बेचव लागला. परत जिभेवरून तो बाहेर लोटून द्यावा अशी तिला प्रबळ इच्छा झाली; आणि चटकन आपणांस वेडाची लहर पुन्हां आली काय, ही शंका तिच्या हृदयाला सुरीच्या धारदार पात्याप्रमाणें चाटून गेली. तिनें भयभीत होऊन कांपऱ्या स्वरांत प्रश्न केला, "नर्स, मी खरो-खरच वेडी झालेय?"

नर्स उत्तर देण्यापूर्वी क्षणभर घोटाळली, थबकली. तिच्या अनुभवानें मेलेल्या नजरेतूनहि करुणा ओसंडत होती. "छट्, कांहीं तरीच-काय? भलतेच कांहींतरी विचार रोग्यानं डोक्यांत शिरवून घेतले, तर दुखणं बळावतं! डॉक्टर रागावतील हो उगाच कांहींतरी बडबडलं तर!" नर्सनें भडकलेल्या कल्पनेचा अंगार बुझवायला, शब्दांची पसाभर राख टाकली.

"तरी पण—"

"पण काय नी परंतु काय? असं कांहींतरी वेड्यासारखं काय बोलतां?"

"पण मी वेडीच झालेय!"

"आतां पहा हं, पुन्हां असं कांहीं ऐकूं आलं तर! ती मैना पहा कशी बसलेय झाडावर! कशी मजेंत आहे नाहीं? तसं आनंदी असायला हवं तुमच्यासारख्या तरुण मुलीनं! हंसावं खेळावं! हे अति विचार करण्याचं खूळ कांहीं बरं नव्हे! अशा शंकाकुशंकांनी खरो-खरच..." आपलें वाक्य गडबडीनेंच मधोमध तोडून नर्स विचारूं लागली, "बरं मग काय आणूं नाश्त्याला? अंडीं कां पॉरिज?"

"कांहीं नको" वैजयंतीनें तुटकपणें उत्तर दिलें. नर्सच्या डोळ्यांतील सहानुभूति तिच्या अंतःकरणाला सुईच्या अग्रासारखी टोचूं लागली.

"नको तर नुसतं दूध आणू? आणि टोस्ट, की आपला संत्र्याचा रस...



"दरबारी कानडा" (एक नवा प्रयोग)

"कांहीं नको म्हटलं नां?" वैजयंती चिडखोरपणें भान हरपून ओरडली.

"बरं बरं राहिलं! अशानं अशक्तपणा वाढेल मात्र! जरा भाव-नेला आवरायला शिका! अच्छा, हीं फुलं तरी पहा! ताजीं आहेत!" विषय बदलत नर्स गडबडीनें म्हणाली. एखादा दुसरा साधा रोगी असता, तर तिनें त्याला चांगलीच समज दिली असती त्याच्या बेगणुकीबद्दल! पण सुमित्राबाईकडून मिळणाऱ्या मोठ्या बक्षिसाची आशा, तिला वैजयंतीचा तुटक माणूसघाणेपणाकडे काणाडोळा करायला लावत होती. "किती सुंदर आहेत नाहीं?"

"छान आहेत. डॉक्टर हॉस्पिटलांतल्या पेशंट लोकांकरितां इतकीं महागडीं फुलं पुरवतात?" पुष्कळसें कडवट विषारी बोलावें असें कां कुणाला ठाऊक वैजयंतीला सारखी इच्छा होत होती.

"डॉक्टर कसे पुरवतील? हीं पाठवलींत तुमच्या मम्मीनं..."

"कुणी?" वैजयंती जवळ जवळ किंचाळली.

"सुमित्राबाईंनीं! कां? काय झालं?" आश्चर्याचा धक्का बसल्या-प्रमाणें हबकून खालच्या सुरांत नर्सनें विचारलें.

"द्या, द्या तीं फेकून गटारांत!" वैजयंती अर्धवट ताडकन् उठून म्हणाली, "मला दृष्टीपुढं नकोत तिचीं फुलं, तिचं कांहीं—"

"हें काय? असं काय बोलतां?" तिला बिछान्यांत दाबून धरत नर्स म्हणाली, "मम्मींना काय वाटेल..."

"सोडा, सोडा म्हणते ना मला! वेडाचा झटका नाहीं आला मला!"

"डॉक्टरनां बोलावूं?"

"कांहीं नको. डॉक्टर नको नि विक्टर नको! तुम्हीहि जा लागा आपल्या कामाला!"

"मग मुकाट्यानं हें औषध घ्या!"

"मला नको. मी घेणार नाहीं! जा इथून म्हणतें ना तुम्ही? मला मरायचंय! नाहीं जिवंत रहायचं मला!"

"वैजयंती!" सहनशीलता पराकाष्ठेला ताणली गेल्यामुळें नर्सचाहि आवाज बदलला! "घेतां की नाहीं?" वैजयंती डोळ्यांवर पंजाची बोटें ठेऊन रडूं लागली. तिचें शरीर हुंदक्यांनीं हलूं लागलें. नर्स बिचारी तिची पाठ थोपटूं लागली. म्हणे जरा भावनेला आवरायला शिका! ही नर्स उपदेश करते! कसें आवरायचें भावनांना! आज-वर बाटलीला बूच होतें तें निघून, आंतला द्रव फसफसून बाहेर येतो आहे.

"मी बोलावतेंच डॉक्टरांना! नाहीं तरी त्यांची राउंडची वेळ झालीच आहे!" नर्स आपल्याशींच बोलते; पण तिचेहि पाय उचलत नाहींत. आपल्या विचित्र पेशंटमुळें तीहि मनांतून बेचैन झाली आहे. दयेच्या दृष्टीनें त्या अगदीं सोळा वर्षांच्या तरुण कोवळ्या, असहाय्य, अगतिक नि अशक्त देहाकडे पहात आहे. गतगोष्टींची नि पार्श्वभूमीची तिलाहि कांहीं कल्पना नसल्यामुळें, तिलाही ह्या एकंदर गुंतागुंतीचें, पेशंटच्या मनांतल्या खळबळीचें आणि विचित्र लहरींचें कोडें उलगडत नाहीं. प्रत्यक्ष मातेविरुद्ध इतकी तेढ कुणी दाखवतें काय? आजकालच्या बदलत्या काळांत, आणि सामाजिक संक्रमणावस्थेंत मातेच्या प्रेमाविषयीच्या

जुन्या कल्पना फोल ठरतात हे कांहीं तिच्या लक्षांत येत नाहीं. माता ही मायेची मूर्तिमंत पुतळी असलीच पाहिजे, अशी तिची सनातनी वृत्ति आहे! एव्हढ्यांत बोटांच्या फटींतून नर्सकडे पहात वैजयंती विचारते, "फुलें फेकून दिलींत नर्स?"

"देऊ फेकून?"

"नाहीं नाहीं! राहूं देत! माझ्या ममीनं पाठवलींत तीं! मोठ्या प्रेमानं, कौतुकानं, नाहीं? होय ना, होय ना?" आर्तपणें वैजयंती विचारते.

तिचा बदललेला नूर पाहून चकित झाल्यामुळें नर्स विचारते, "ममीनां फोन करून बोलावूं?"

"ममीला नका बोलावूं? ममीला नका बोलावूं? तिला नाहीं कांहीं कळायचं!" भीतीनें वैजयंतीचा सूर विकृत झाला आहे! थरथर कांपणाऱ्या कोंकरासारखी ती नर्सकडे पहात रहाते.

"असं काय बरं? हा काय वेडा हट्ट? त्यांना किती वाईट वाटत असेल? कधींच नाहीं कां भेटणार त्याना?" विषण्णपणें नर्स विचारूं लागते.

"नाहीं नाहीं! कधींच नाहीं! मला नाहीं पहायचा तिचा चेहरा!"

"इतक्या सुंदर चेहऱ्याला पुन्हा पहणार नाहीं?"

"सुंदर! म्हणे सुंदर!" वैजयती किंचाळून बोलते. "घाणेरडा, विद्रूप, काळ्या कोडानं भरलेलं काळं तोंड—"

"भलतंच कांहींतरी!" नर्स आपलेंच घोडे पुढें दामटते. तिला मानसशास्त्र समजत नाहीं! तिचे वैजयंतीच्या चेहऱ्यावरील भावांकडे लक्ष नाहीं!

"तो पहा मला अजूनही दिसतोय! मी–मी कारण आहे, मी! माझी ममी ग—" वैजयंती किंचाळून धाडकन् बेशुद्ध होऊन बिछान्यावर पडते. तिला ग्लानी आली आहे. नर्स बिचकून एकदां तिच्या मिटलेल्या डोळ्यांकडे पहाते, आणि घाबरटपणें डॉक्टरांकडे पळते. डॉक्टर येतात आणि गुंगीचें औषध टोचतात, नाडी पहातात! आणि निश्चल पडलेल्या वैजयंतीच्या चिमुकल्या देहावरून रग ओढून, समाधानी वृत्तीनें कामाला निघून जातात! त्यांच्या मतें आतां चार तासांची निश्चिती झाली. ती खोली पुन्हा एकवार निस्तब्ध होते, वैजयंतीच्या मनांत चाललेल्या वादळाची चाहूल घेते! तिच्या वृत्तीशी तन्मय होते!

वैजयंतीच्या मनांत जमा झालेलीं कोळिष्टकें अजून कांहीं दूर झालीं नाहींत. फक्त त्या दिवशींच्या प्रकारानें तीं कोळिष्टकें, वावटळी-प्रमाणें तिच्या मनांतल्या मनांत इतस्ततः उडवून दिली होतीं आणि त्यांचीं लक्तरें कोनाकोपऱ्यांत चिकटून लोंबत होतीं. रितीभातीची, शिष्टाचारांची इस्त्रीची घडी मोडून, आंतला मळका भाग बाहेर डोकावूं लागला होता. तिला कांहीं झोप लागत नाहीं. बिछान्यांतल्या बिछान्यांत ती असहाय्यपणें चाळवाचाळव करते.

वैजयंती सारी पंधरा सोळा वर्षांची किशोरी होती. तिच्या कृश-बांध्यामुळें ती त्याहूनही लहान दिसते! पण वयाच्या मानानें तिची विचारशक्ति अधिक जबर होती. ती आपल्या वडलांच्यासारखी कुशाग्रबुद्धीची आहे, असें सारीं नातेवाईकमंडळी म्हणत. आपण

कलाकृतींच्या जन्मकथा :



# दोन देशांत तह घडविणारी कलाकृति !

या चित्राचें नांव आहे 'शांततेचें वरदान' चित्रांतील विषय असा आहे कीं सौख्य आणि संपत्ति या जोडप्याचें स्वागत शांतता करीत आहे. त्या जोडप्यानी फळाफुलांचा आहेर बरोबर आणला आहे आणि या जोडप्याची सुंदर गोजिरवाणी बालकें शांत-तेला विलगू पहात आहेत. याच चित्रांत पार्श्वभूमीवर दाखवलेली देखावा मात्र फार निराळा आहे. मागच्या बाजूला युद्धाची देवता मिनर्व्हा युद्धाला पाचारण करीत आहे आणि पुन्हा साऱ्या जगांत हलकल्लोळ माजावा अशी मिनर्व्हाची इच्छा आहे. जणूं हे चित्र काढून चित्रकारानें जगाला प्रश्न टाकला आहे कीं, 'सौख्य आणि समृद्धि यांच्याशी खेळीमेळीनें नांदणारी शांतता तुम्ही स्वीकारणार कीं बुद्धिमंताना हव्या असलेल्या युद्धाला तुम्ही सुरवात करणार?'

युद्ध आणि शांतता, हल्ले आणि तहनामे, जुल्मशाही आणि समतावाद या विषयावर आजपर्यंत अनेक पुढाऱ्यांनी भाषणें करून निवडणुकीची व्यासपीठें गाजवली आहेत, अनेक देशांच्या मन्त्रिमंडळांच्या बैठकींतून या विषयावर प्रभावी चर्चा करून मुत्स-द्यांनी स्वतःचे तेज दाखवलें आहे, वृत्तपत्रांचे रकानेच्या रकाने त्या कार्यासाठीं खर्ची पडले आहेत. आणि त्या त्या वेळीं काळाप्रमाणें इतिहासाला कलाटणी मिळाली आहे. पण पुढाऱ्यानें बोलणें अगर संपादकानें लिहिणें यापेक्षां एखाद्या चित्रकारानें चित्र काढून या विषयाबद्दलचें आपलें मत कलाद्वारे प्रदर्शित करावें आणि तें सुद्धां इतकें प्रभावी ठरावें कीं त्यामुळें कांहीं काळ युद्धाचे विचार निवळे जावेत हे आश्चर्य नव्हे कां? जें कार्य तलवारीनें अगर लेखणीनें करा

यचें ते कार्य कुंचल्यानें घडावें हे नवलच म्हटलें पाहिजे. 'शांततेचे वरदान' हे रूबेन्सचें चित्र यामुळेंच विशेष भाग्यशाली ठरलें आहे. १६२९ मध्यें रूबेन्सनें हे चित्र काढून इंग्लंड आणि स्पेन यांतील मैत्री टिकवून धरली !

सतराव्या शतकाच्या पूर्वार्धात होऊन गेलेल्या रूवेन्स या चित्रकारानें त्यावेळच्या युरोपच्या राजकारणावर आपल्या कलाकौशल्यानें आणि व्यक्तिमत्वानें विलक्षण प्रभाव पाडला होता. स्पेन, हॉलंड, इंग्लंड आणि फिनलंड या देशाच्या परस्पर संबंधांतील एक दुवा म्हणून रूवेन्सनें मोठी कामगिरी बजावली. त्या काळांतील युरोपांतला महान मुत्सद्दी पुरुष ड्यूक ऑफ बकिंगहॅम हासुद्धां रूवेन्सवर खूप होता. कलावंत आणि राजकारणी म्हणून तो रूवेन्सची चहा करीत असे आणि स्पेनबरोबरच्या इंग्लंडच्या वाटाघाटींत रूवेन्सनें महत्त्वाचा भाग घ्यावा असें स्वतः ड्यूक ऑफ बकिंगहॅमनें सुचवलें होतें.

परदेशांत सचीव म्हणून जाणाऱ्या इतर व्यक्ति निराळ्या आणि रूवेन्सची गोष्ट निराळी. सचीव म्हणून एखादा चित्रकार गेला म्हणजे त्याचा साराच थाट निराळा ! रूवेन्स येणार असल्याची वार्ता दरबारला लागली म्हणजे इतर सचिवांपेक्षां या सचिवाचे स्वागत करायला दरबारांतले सारेच लोक उत्सुक असत. स्वतः राजा त्याची भेट आवर्जून घेई. कारण रूबेन्सच्या कलाकृति पहायला राजालासुद्धां कुतुहल वाटे आणि रूवेन्स जेव्हां एखाद्या महत्त्वाच्या वाटाघाटीला जाई तेव्हां कागदपत्राच्या फायली नेण्यापेक्षां चित्रेंच अधिक नेई. दरबारांतल्या बड्या व्यक्तींच्या आणि राणीपासून साऱ्या राजकुटुंबियांच्या भेटी चित्रें दाखवण्याच्या निमित्तानें तो घेत असे. त्यांना चित्रें आहेरादाखल देई. आपल्या कलाकौशल्यानें त्यांची मने जिंकी, आणि मग त्या खेळीमेळीच्या वातावरणांत त्यांच्या मनाचा तो कानोसा घेऊन सचीवपणाची कामगिरी बरोबर बजावीत असे. विषारी नागसुद्धां पुंगीच्या नादानें डुलू लागावेत त्याप्रमाणें राजकारणांतल्या कुटिल व्यक्ती रूबेन्सच्या कलाकर्तृत्वानें मोहित होत.

१६२२ च्या जानेवारी महिन्यांत फ्रान्सची राजमाता मारिए डे मेडिका हिनें त्याला लुक्झेमबर्गचा राजवाडा चित्रित करण्याचें काम दिलें. या राजवाड्यांतील भिंतींवर रूबेन्सनें अशीं उत्कृष्ट चित्रें रंगवली कीं फ्रान्सला ती भूषणभूत ठरली. फ्रान्सचा राजा चौथा हेन्री आणि मेडिका यांच्या विवाहानें फ्रान्सचें कसें हित झालें हाच विषय रूबेन्सनें या चित्रांतून मांडला आहे. सर्व स्वर्गीय देवदेवता चौथ्या हेन्रीला मेडिकाचें सुंदर चित्र आणून दाखवीत आहेत असें एक चित्र या चित्रमालेंत रंगवलें आहे. मेडिका त्याच्या या चित्रकौशल्यानें खूप झाली. राजकारणांतले विचार कौशल्यानें कलाद्वारें प्रगट करणारा रूबेन्स हा एक मोठा जादुगार आहे अशी जाणीव युरोपांतल्या राजघराण्यांना या चित्रामुळें होऊ लागली. पोनंतर इंग्लंड आणि हॉलंडशी मैत्री करण्याची कामगिरी फ्लँडरची राजमाता इझावेल हिनें रूबेन्सकडे सोंपविली, आणि ती त्यानें प्रामाणिकपणें बजावली. बकिंगहॅमच्या निदर्शनाला रूबेन्सची कामगिरी येतांच इंग्लंडतर्फे स्पेनला रूबेन्सनें जावें आणि स्पेनच्या चौथ्या फिलिप्सचें मन युद्धासंबंधीं काय आहे तें अजमवावें अशी कामगिरी त्यानें रूबेन्सवर सोंपविली. आठ चित्रें बरोबर घेऊन फिलिपला भेटण्यासाठीं रूबेन्स गेला. ही सारीं चित्रें त्यानें फिलिपला भेट म्हणून दिली. अर्थात् या भेटींनें फिलिप स्वाभाविकच खूप झाला. पण याचवेळीं इकडे बकिंगहॅमचा अपघाती मृत्यू झाल्यामुळें राजकारणाला निराळी कलाटणी मिळाली आणि रूबेन्स ज्या कामासाठीं आला होता ते कार्य मागें पडलें. स्पेनमधलें रूबेन्सचें वजन मात्र वाढलें. फिलिपचा तो आवडता झाला. फिलिपनें स्पेनचा वकील म्हणून रूबेन्सला इंग्लंडला पाठविलें आणि पहिल्या चार्ल्सचें मन वळविण्याची कामगिरी त्याच्यावर सोंपवली.

२५ मे १६२९ ला रूबेन्स लंडनला येऊन पोंचला. चार्ल्सनें त्याचें सुस्वागत केलें. त्याचीं अनेक चित्रें राजकुटुंबियांनीं आणि उमरावांनीं खरेदी केलीं. रूबेन्सवर इंग्लडचा सारा दरबार खूप होता. 'शांततेचें वरदान' हें चित्र त्यानें या काळांतच चितारलें आणि चार्ल्सला अर्पण केलें. स्पेनशी तह करून शांतता रक्षण करण्यानें युरोपचे कल्याण आहे हाच विचार या कलाकृतीच्या निमित्तानें रूबेन्सनें चार्ल्सपुढें मांडला. आणि इतर कोणच्याही युक्तिवादापेक्षां या कलाकृतीमुळें राजाचें मन शांततेच्या बाजूकडे वळलें. स्पेन व इंग्लंड यांत सलोखा निर्माण करण्याचें कार्य या कलाकृतीनें घडवलें.

हे चित्र पुरें करीत असताना इंग्लड मधला एक उमराव रूबेन्सला म्हणाला, "एक राजकारणी पुरुष करमणुकीसाठीं चित्रकलेंत वेळ घालवतो हे नवलाईचें आहे !"

यावर रूबेन्स् म्हणाला, "आपला गैरसमज झाला आहे. मी मुळांत राजकारणी मनुष्य नाहीं. जन्मतः मी चित्रकार आहे. आणि करमणूक म्हणून मी राजकारणांत भाग घेत असतो. 'राजकारणी' म्हणवून घेण्यापेक्षां 'चित्रकार' म्हणवून घेणें मला अधिक गौरवाचें वाटतें. आणि यासाठीं लौकरच मी राजकारणांतून निवृत्त होणार आहे. माझें उरलेलें सारे आयुष्य चित्रकलेच्या सेवेंत घालवणार आहे."

राजकारणांतलें यश रूबेन्सच्या वाट्याला अधिकाधिक येत असूनही त्यानें राजकारणांतील अंग काढून घेतलें आणि तो आपल्या जन्मगांवीं जाऊन राहिला. अखेरपर्यंत उरलेला काळ त्यानें चित्रकलेच्या सेवेंत घालवला. आणि त्याच्या इच्छेप्रमाणें राजकारणी म्हणून नव्हे तर चित्रकार म्हणूनच त्याचें नांव युरोपच्या इतिहासांत चिरस्थायी झालें.

— भय्यासाहेब ओंकार

---

इतर बाबतींतही वडलांच्याच वळणावर गेलीं आहेत, ह्या गोष्टींचें वैजयंतीला अतिशय वैषम्य वाटे. त्यांच्यासारखाच तिच्या नाकावर चष्मा बसला होता ! त्यांचीच उदास गंभीर वृत्ति, काळा रंग, विरळ केस सारें कांहीं त्यांचेंच होतें ! सुमित्राबाईंच्या पोटीं हा नमुना झाला म्हणून जसें लोकांना आश्चर्य वाटे त्याप्रमाणें स्वतः सुमित्राबाईंनाही वाटलें होतें ! त्यामुळें वरचेवर मुलें नकोत म्हणून संतति नियमन केलं म्हणून म्हणा, डॉक्टरांना फार काम असे म्हणून म्हणा, अगर संबईच्या परिणामानें सालारानें मुलें व्हायचीं थांबली म्हणून म्हणा, व्यवहारिकपणामुळें अंतःकरनें दुरावलीं म्हणून म्हणा, कांहीं कारणानें सुमित्राबाईंना वैजयन्तीवर दुसरें मूल झालें नाहीं तें

नाहींच ! वैजयंतीचा नमुना पाहूनच त्यांना समाधान मिळालें असावें बहुतेक !

सुमित्राबाईंना नाहींतरी मुलांचा पाश नकोच होता. त्यांच्या नाजूक सौंदर्याला साजेशीच त्यांची आनंदी फुलपाखराची वृत्ति होती. सौंदर्याला जीवनाची मजा लुटायचा पहिला मान मिळतो आणि त्याकरतां पैसा उभा करणारा कुणीतरी असतोच ! डॉक्टर आपलें घाणा ओढणाऱ्या बैलाचें कर्तव्य पार पाडत होतेच, न कुरकुरतां ! त्यांत त्यांना वाईट वाटत असेल अशांतलाही भाग नाहीं ! सतत काम करीत रहाण्यांतच असल्या माणसाना मानसिक समाधान मिळतें ! सुरवातीसुरवातीला सुमित्राबाईंनीं नवऱ्याच्या सहवासाची अपेक्षा केली, रुसवे फुगवे झाले, आणि नंतर त्यांचा नाद सोडून देऊन सुमित्राबाईंनीं आपलें जीवन उभारलें. तिचे छंद, तिची मित्रमंडळी, तिचे कार्यक्रम यथास्थित चालू होते ! सौंदर्य व पैसा स्त्रीपाशीं असला, आणि बरोबरीनें दिलखुलास, रंगेल वृत्ति असली कीं परिवाराला, खुषमस्करीला, नी स्तुतीला सीमा रहात नाहीं. त्या गोष्टींची नशा चढते.

तिच्या जीवनांत आपल्याला स्थान नाहीं म्हणून डॉक्टरांना कधींच कांहीं वाटलें नसेल, पण वैजयंतीच्या भावनाशील मनाला मात्र पहिल्यापासून त्रास होत होता. डॉक्टरांच्या वैभवाला साजेशी मालकीण मिळाली होती, सुमित्राबाईंच्या सौंदर्याला साजेसें ऐश्वर्य होतें पण वैजयंती—सुमित्राबाईंनें तिलाहि कधीं अवास्तव महत्त्व दिलें नाहीं. अधीं तिच्या कुरूपतेमुळें ती सुमित्राबाईंना फारच कमी आवडे, तरीही आईच्या नैसर्गिक मायेनें कपडे, शिक्षण, आया, खाणेपिणें ह्याबाबतींत त्यांनीं तिचे कुठेंही कमी केलें नाहीं. त्यांना मुलांचीही विशेष आवड नव्हती म्हणून म्हणा, त्यांचा संसारी स्वभाव नव्हता अगर घरांत विपुलता होती, नोकरचाकर होते म्हणून म्हणा, त्यांनीं वैजयंताची स्वतः जातीनें विशेष विचारपूस वा पर्वा कधींच केली नाहीं. तिच्या करतां वेळ खर्च केला नाहीं. व वैजयंतीच्या मनांतल्या मनांत कुढणाऱ्या, अबोल घुम्या स्वभावालाही आईच्या काळजाचा ठाव घेणें शक्य झालें नाहीं !

ती वडलांसारखीच घुम्मी, तुसडी, अबोल होती ! ममी सारखी न झाल्यामुळें मनांत झुरत होती. लोकांनीं केलेल्या तुलनेमुळें शरमून निघत होती. त्यामुळें स्वतःच्या तल्लख बुद्धीचें कौतुकही तिला कधीं वाटत नसे. ममीच्या लोकप्रियतेचा, तिच्या बेपर्वा स्वच्छंदी जीवनाचा सौन्दर्याचा नि आनंदी स्वभावाचा मनांतून द्वेष करीत होती, आणि तरीहि मनांतून इच्छा नसतांनासुद्धां, तिला ममीच्या न सुकणाऱ्या, नेहमीं ताज्या टवटवीत दिसणाऱ्या सौन्दर्याबद्दल कौतुकमिश्रित आश्चर्य वाटे. आंतरअभिमान वाटे. ती आपल्याला खूप विरोध करून पाही, ममीविषयींचा द्वेष फुंकून फुंकून फुलवी ! तरीपण ममीच्या लोकप्रियतेनें, तिच्या सौन्दर्यानें व जीवनाचा आनंद लुटणाऱ्या वृत्तीनें चकित होऊन मूढ बने. ती आपली अगर वडलांची मुळींच पर्वा करत नाहीं म्हणून तिला चीड येई. तशांत वडीलहि नेहमीं कामांत असल्यामुळें तिच्याकडे लक्ष पुरविण्यास त्यांना सवड अगर उत्साह नसे. दुर्दैवानें बरोबरीचें भावंडहि कुणी नव्हतें. आपण ह्या जगांत अगदीं एकाकी, अगतिक आहोंत ही भावना वैजयंतीच्या मनांत लहानपणापासून रुतून बसली होती. असहाय्यतेची, एकाकीपणाची, स्वतःच्या कुरूपतेची जाणीव, तशांत आईचें सदैव डोळ्यांसमोर असणारें झगझगतें व्यक्तिमत्व, वत्सलतेची, मायाममतेची उणीव, ह्यामुळें वैजयंतीचा मूळचा कुढा स्वभाव अधिकच अंतर्मुख कुढा बनला होता. तिच्या संवेदनाशील मनांत, हेवादाव्याची, मत्सराची जोपासलेल्या दुःखित भावनांचीं कोळिष्टकें जमत होतीं. द्वेषाचीं रोपटीं वाढीला लागत होतीं. शल्यांचीं गळवें पिकून, ठसठसून ठणका लागूं लागला होता.

तशांत तिचे पपा वारले ! पत्नीचा स्वच्छंदीपणा, मैत्रिणींपेक्षां मित्रांचे असलेले गोतावळे ह्या गोष्टी जणुं काय त्यांच्या कधींच लक्षांत आल्या नव्हत्या, म्हणून साऱ्या ऐश्वर्याची मालकी त्यांनी पत्नीच्या नांवावर करून दिली होती ! जणुं काय ह्या रीतीनें त्यांनीं आपलें अबोल प्रेम आणि कौतुक व्यक्त केलें होतें ! ह्या गोष्टींचें जास्तींत जास्त दुःख कुणाला झालें असेल, जळजळता द्वेषराग कुणाच्या मनांत उफाळून आला असेल, तर तो वैजयंतीच्या—तिच्या कुढ्या मनांत, मुस्कुटदाबी केलेल्या भावनांचा ज्वालामुखी पेटत रसरसत होता. स्फोटच काय तो व्हायचा बाकी राहिला होता ! तिचें तरुण वय, अपरिपक्व अशा विकृत मनोवृत्ति, कृश देह, असहाय्यता, एकाकीपणा, अगतिकता, सदा विचार, एकंदर विरोधी वातावरण आणि त्यांत भर घालायला जीवघेणा परावलंबीपणा ! ममीच्या मुठींत नाक ! ममीशीं असलेली तिच्या मित्रांची खेळीमेळीची, लगटीची वागणूक पाहून, तिला कसली तरी आगळी हुरहूर जाणवे. वाढत्या वयाला असूया वाटे; पण तिचें तिलाच कळत नव्हतें !

लेकीच्या मनांतल्या वादळाची सुमित्रेला अजिबात कल्पना नव्हती ! आपल्याविषयीं लेकीच्या मनांत काहूर उठले आहे, शंकाकुशंकांचें मोहळ जागे झालें आहे, ह्याची सुमित्राबाईंना यत्किंचितहि दाद नव्हती. आपल्या उरल्यासुरल्या जवानीची मजा लुटण्याचा त्यांचा धंदा चालूच होता. चार गेलीं पांच राहिलीं, तारुण्याची, घनदाट वनराई संपून पोक्तपणाच्या रखरखीत माळरानाच्या सीमेवर आपण येऊन पोहोंचलों आहोंत, तेवढ्यांत मागें वळून पाहण्याचा मनमुराद आनंद उपभोगूं या, असें त्याचें मन त्यांना सतत उत्तेजन

देत होतें! डॉक्टरांनीं वेळेवर स्वर्गवासी होऊन त्यांना आपल्या जबाबदारींतून मोकळे केलें होतें. रहातां राहिली वैजयंतीची जबाबदारी! ती तर त्यांच्या खिजगणतींतच नव्हती. ती वयांत येत आहे, आणि तरीहि एकटी एकलकोंडी आहे, तिला समवयस्क मित्र-मैत्रिणी कुणी नाहींत! आपले भुगतगण पाहून तिच्या मनांत काय भावना उद्‌भवत असतील ह्याशी त्यांनी कधीं दखलहि घेतली नाहीं! सौन्दर्याबरोबर येणारा स्वार्थ त्यांच्या शरिरांत मुरला होता! कसल्याच गोष्टींची आवड नसलेल्या, सदा पुस्तकांत नाक खुपसून बसलेल्या त्या पुरुषकी किड्यापासून चार पावलें दूर रहावें असेंच त्यांना वाटे. चष्म्याआडून अधिक निस्तेजपणें डोकावणाऱ्या स्वप्नाळू नजरेची त्यांना भीति वाटे. कधीं विचारपूस करायला म्हणून त्या वैजयंतीच्या खोलींत गेल्या, तर तेथून त्यांना दूर पळावेसें वाटे. आपणां दोघां मायलेकींत उभी खोल दरी आहे, अंतराय आहे ही जाणीव त्यांना कधींच झाली होती. त्यामुळें आपल्या जीवनाचें धागे वैजयंतीच्या जीवनांत गुंतूं न देण्याचा त्या प्रयत्न करीत, त्यांतच दोघींनांही सुख आहे, असें त्यांना वाटे! वैजयंतीही अबोल, अलिप्त राहिल्यामुळें, किती गुंतवळ झाली होती, ह्याचा त्यांना कधीं कयासही आला नाहीं! ती घरांत आहेनाहींशीच त्यांना वाटे, कारण तिची अजिबात गडबड नसे! आपण जीवनांत फार यशस्वी झालों आहोंत असें सुमित्राबाईंना उगाचच वाटे, आणि अधिकच हुरूप येई!

वैजयंती मात्र मनांत आग चेतवत होती. तिला त्या विशिष्ट मनोवृत्तींतून बाहेर खेचून काढायला साथीसोबती कुणी नव्हते. इतर करमणूक नव्हती! तासन्‌तास ती सुमित्राबाईंचें जीवन निरखीत बसे त्यांच्या नकळत! अंधारांत कठड्याला रेलून, सुमित्राबाईंचा आपल्या नवनव्या मित्रांशीं चाललेला आमोदप्रमोद ती ऐकत बसे. त्यांच्या खालच्या दिवाणखान्यांत चाललेल्या पार्ट्या व चैनीची आतषबाजी, चाहूल न देतां पहात बसे. त्या कुणाबरोबर बाहेर गेल्या असल्या कीं तासन्‌तास त्यांच्या परत येण्याची चाहूल घेत जागत बसे आणि आपल्याला कुणी एक प्रेक्षक आहे, कुणी तरी आपल्यावर टेहळणी ठेवत आहे ह्याची सुमित्राबाईंना दादही नसे! अनोळखी भावनेनें शरीरावर उठवलेल्या रोमांचानीं, तिचा द्वेष अधिकच भडके!

असेंच सारें पहातां पहातां नी ऐकतां ऐकतां वैजयंती स्वतःच्या मनांतील द्वेष चेतवी! ममी पपांशीं बेइमानी करत आहे, घराण्याची अब्रू घालवत आहे म्हणून आपल्याला द्वेष येतो असें ती आपल्या मनाचें समाधान करी! परंतु स्वतःला वाटणाऱ्या द्वेष मत्सराची मात्र ती आपल्या मनाशीं कबूली देत नसे. ममीनें स्वतःच्या तोंडाला काळें फासलें आहे, पण पपांनीं तिच्यासाठीं समाजांत निर्माण केलेल्या दर्जामुळें कुणी तसें तोंडावर सांगत नाहीं नि ममीहि समाजाला भीक घालत नाहीं! तेव्हां ममीच्या तोंडाला काळें कोड होऊन तें उघड रीतीनें काळें व्हावें, जन्माची काळतोंडी म्हणून समाजापुढें मिरवीयला लागावें, म्हणजे तिची कशी छी थू होईल ह्याचें चित्र तिनें रंगवावें, कागदावर रेखाटावें. त्याच गोष्टीची पुन्हांपुन्हां सुखस्वप्नें पहावीं! अशा रीतीनें सूडाचें वेड तिच्या मनांत उग्र रूप धारण करत असतांना तो त्या दिवसाचा प्रकार झाला—

सबंध जिना अंधारांत होता पण खालच्या दोन पायऱ्या दिवाणखान्यांतील उजेडानें प्रकाशित झाल्या होत्या. वैजयंती कठड्याला रेलून दिवाणखान्यांत काय चाललें आहे तें पहात होती. रात्रीं अकरा वाजेपर्यंत ती जागी होती व नंतर तिचा जरा डोळा लागला होता. तरी तिचें जागृत मन कानोसा घेत होतेंच! मोटारीचा कर्णा वाजतांच, ती झटकन् उठली आणि खिडकींतून रेलून पाहूं लागली वळणावरच झगझगलेले मोटरीचे बटबटीत डोळे तिनें पाहिले होते आणि नंतर सिंधियानीच्या अवाढव्य कॅडिलॅकचा आकार, अंधारांतच बसलेल्या मोठ्या थोरल्या कासवाप्रमाणें दिसूं लागला होता. वैजयंती चोरपावलांनीं अंधारांतच चार पायऱ्या उतरून पाहूं लागली होती.

एकमेकांशीं लगट करत त्यांचें 'पिणें' आता अर्धा तास झाला तरी चालू होतेंच. रात्रीचे बारा वाजून गेले होते आणि तरीहि तिची ममी ताजी तवानी दिसत होती, लहानसा गोंडस बांधा, कुरळे बॉब केस आणि तजेलदार कांती! त्या 'कन्सिल्ड' रचनेच्या दिव्यांच्या प्रकाशांत, चेहऱ्यावर एखादी सुरकुती असेल तीहि लुप्त झाली होती. कोण म्हणेल ही चाळिशी उलटून गेलेली स्त्री असेल म्हणून! रेडियो-ग्राममधून सायोनाराचे मंद मधुर स्वर कंप पावत बाहेर येत होते! मधूनच तें गीत बंद करून सिंधियानीनें 'फॅसिनेशन्' लावलें आणि तो तारेंत विचारूं लागला, "तुझी बेबी झोपली वाटतं?" "असेल!" वैजयंतीच्या अस्तित्वाबद्दल त्या रोमांचकारी क्षणाला वाटणारी उदासीनता तिच्या शब्दांतून थबथबत होती. उलट आपण एका जाणत्या मुलीची आई आहोंत ही करून दिलेली जाणीवसुद्धां तिला आतां नकोशी वाटत असेल, असें वैजयंतीला वाटले.

"बाकी ती तुझी मुलगी शोभण्यापेक्षां, परकीच कुणीतरी कझीन वाटते!"

"चल कांहींतरीच? खुळा कुठला! मी कां इतकी तरुण दिसते?"

"नाहींतर काय?" कोण म्हणणार ती तुझी मुलगी म्हणून?" सिंधियानी विचारूं लागला नी वैजयंतीच्या हृदयांत खळकन कांहींतरी फुटलें. "You have perfectly facinated me! चल आपण वॉल्ट्झ करू!" तिला कंबरेला धरून खेचत तो झिंगत झिंगत झोकांडे खात, फॅसिनेशनच्या दर्दभऱ्या सुरांवर नाचण्याचा प्रयत्न करूं लागला.

आणि त्याच वेळीं वरून वैजयंती मोठ्यानें भेसूरपणें नी बेसूरपणें "काळतोंडी" असें ओरडत, आणि विलक्षण हातवारे करून धांवत खालती आली, अगदीं वेड्यासारखी! नजिकच्या शिडिण्याच्या टेबलावरची हाताला येईल ती वस्तु तिनें उचलली आणि आईच्या तोंडावर फेकली. काळ्या शाईनें सुमित्राबाईंचें तोंड लडबडून, काळें दिसू लागलें आणि तेंच काळें तोंड पाहून वैजयंती बेशुद्ध होऊन पडली! एक किंकाळी फोडून!

(पान ६६ वर चालू)








# उत्कर्षाचा महामंत्र



शां. शं. रेगे

पाश्चात्य संस्कृतीच्या अनुकरणामुळें आपल्या लोकांत आज तीन दुर्गुण वसत आहेत. ते म्हणजे वक्तशीरपणा, कार्यक्षमता आणि आत्मोद्धारासाठीं सतत झगडण्याची वृत्ति. पाश्चात्य लोकांत ह्या दुर्गुणांचें इतकें स्तोम माजविलें गेलें आहे कीं हे सर्व जणुं आवश्यक गुण असें समजून त्यांच्या जोपासनेसाठीं आज शेंकडों ग्रंथ, आणि प्रत्यक्ष अगर टपालद्वारा त्यांचें शिक्षण मिळण्याची व्यवस्था आज तिथें सुलभ झाली आहे. खरें म्हटलें तर हे तीनहि विघातक दुर्गुण आहेत, आणि त्या तीनहि प्रवृत्तींच्या मागें एकच अनैसर्गिक तत्त्व आहे आणि तें म्हणजे घाई. पहिला व्यवहार झटपट उरकून दुसऱ्या व्यवहारासाठीं सज्ज व्हायचें म्हणजे वक्तशीरपणा; हातचें काम झटपट उरकणें म्हणजे कार्यक्षमता; आणि दुसऱ्याला मागें लोटून झटपट पुढें जाणें म्हणजे आत्मोद्धार. अशा ह्या झटपट व झटापटीच्या उपक्रमांनीं मानवी जीवनाचें स्वास्थ्य आज पार नाहीसें झालें आहे.

कोणतेंही काम सावकाशपणें केलें तरच तें व्यवस्थित होतें हा वास्तविक जगाचा रूढ अनुभव आहे. सावकाश चाललें तर वाकडें पाऊल पडण्याची भीति नसते. पण ह्याउलट घाईघाईनें चाललें तर धक्काबुक्कीबरोबर पायांत पाय अडकून पडण्याची भीति असते. मोकळ्या मैदानांत अमक्या सेकंदांत जलद चालण्याचा रेकॉर्ड मोडणारा माणूस, ऑफिसला लवकर जावें म्हणून सकाळच्या भाऊगर्दींत धांवपळ करूं लागला तर वाहनांच्या तडाक्यात सांपडून त्याची तंगडीच मोडायचा संभव अधिक. जेवतांना प्रत्येक घांस बत्तीस वेळां चावला तर तो पचनीं पडतो हा आरोग्यशास्त्राचा नियम आहे. पण हा नियम धाब्यावर बसवून खोट्या कार्यक्षमतेच्या आहारीं गेलेल्या माणसाच्या जलद आहाराची परिणति अखेर पोटशूळांतच व्हावयाची. शिवाय आजच्या ह्या झटपट युगांत जलद जेवणाऱ्यांसाठीं जलद पाकसिद्धीचेंही खूळ निर्माण झालें आहे आणि त्यामुळें जुन्या जमान्यांतली भोजनाची रुचवत्ता आज पार नाहींशी झाली आहे. पिठाच्या गिरणींतल्या दळणाऱ्या जात्याला जशी पिठाची चव समजत नाहीं तसेंच ह्या घाईघाईनें घशाखालीं घांस घालणाऱ्या भोजकाच्या दांता-जिभेला अळणीखारटाचा मागमूस लागत नाहीं. आजच्या युगांत "अप्रियस्यापि पथ्यस्य कर्ता भोक्ताच दुर्लभः" ही उक्ति दुर्दैवानें खरी ठरली आहे.

वेळच्या वेळीं प्रत्येक काम करायची एकदां संवय जडली कीं मनःस्वास्थ्य नाहीसें होतें. हातीं घेतलेल्या कामावर एकाग्रतेनें लक्ष केंद्रित न होतां आगामी नियोजित कामाकडे मन सारखें धांव घेत राहातें. त्यामुळें चालू काम तर नीट होत नाहींच पण उलट जास्त बिघडतें. आपल्या परिचयाचें परीक्षांपद्धतीचेंच उदाहरण घ्या. तीन तासांत सहा प्रश्न सोडवायचे म्हणजे अर्ध्या तासांत प्रत्येक प्रश्न पूर्ण व्हावयास पाहिजे. जो विषय शिक्षकांना एका वर्षांत विद्यार्थ्यांना समजावून देणें जमलें नाहीं, त्या विषयांतले यक्ष प्रश्न तीन तासाच्या अवधींत परीक्षकाला समजावून देण्याच्या प्रयत्नांत विषयाच्या अगम्यतेला वेळेचें आणखी बंधन पडल्यामुळें गिचमिड अक्षर, उत्स्फूर्त वाक्यरचना आणि परीक्षकांशीं वैचारिक मतभेद ह्यांच्या संकलित परिणामामुळें शेंकडा पन्नास टक्के विद्यार्थी कामीं येतात. ह्यापेक्षां घरच्याघरीं अनेक ग्रंथांचें सहाय्य घेऊन एखाद्या सुलभ विषयावर प्रबंध लिहिणें किती सोयिस्कर! सुरेख टंकलेखन, मोहरेदार कागद, सोनेरी बांधणी आणि त्याबरोबर भरपूर ऋणनिर्देशांनीं युक्त असलेले हे प्रबंध यशस्वी ठरतात ह्याचें मुख्य कारण म्हणजे स्थलकालबंधनांचा अभाव हेंच खरें.

वेळच्या वेळीं काम करण्याची एकदां संवय जडली कीं माणूस वेळेचा गुलाम बनतो. संवय ही काठीसारखी बाळगली पाहिजे, कुबडीसारखा तिचा उपयोग होऊं लागला कीं माणूस आपोआपच पंगु बनतो. कोणतीही संवय लावून घ्यायची ती आपल्या सुखासाठीं आणि ज्याला आपलें मनःस्वातंत्र्य अबाधित राखायचें असेल त्यानें ही उपकारक संवयसुद्धां कधीं कधीं मोडली पाहिजे.

"आपले पूर्वज – आदिमानव किती सुखी होते!" रानावनांत स्वैर हिंडणें आणि








अनुक्रमणिका

निसर्गाशीं इमान राखून जीवन आचरणें ह्यांतच त्यांना खरें सुख वाटत असे. भूक लागेल ती खाण्याची वेळ आणि डोळे मिटतील ती झोंपण्याची वेळ—ह्या दोनच वेळा त्यांना माहित होत्या. देहधारणेप्रमाणें आणि ऋतु-मानाप्रमाणें त्यांत बदल झाला तरी त्यांना तें जाणवत नसे. ह्या नैसर्गिक दिनचर्येमुळें त्यांना बल, आरोग्य व दीर्घायुष्य लाभलें होतें. पुढें कालांतरानें मानवाला निसर्गाशीं चढाओढ करण्याची दुर्बुद्धि झाली. कुणीतरी कालमापनाचें गणित सोडवूं लागला. मग छायायंत्र आलें, घटिकायंत्र निर्माण झालें व वालुकायंत्रहि तयार केलें गेलें. पण स्थूल कालमापनाच्या ह्या साधनांनीं मानवाचें समाधान झालें नाहीं म्हणून कीं काय आणखी खटपटी करून तासाच्या बरोबर मिनिटें व सेकंद दाखवणारीं घड्याळें तयार केलीं गेलीं, प्रथम दिवाणखान्यांत लटकणारीं हीं घड्याळें हळूहळू अंतःपुरांत शिरलीं, मग खिशांत घुसलीं आणि अखेरीस मनगटावरहि चढलीं. हल्लीं तर आंगठींत मढवलेलें घड्याळही निर्माण झाल्यामुळें काळ मानवाचें बोट धरूनच जणूं त्याला आपल्याबरोबर खेंचत नेत आहे असें वाटतें.

आजच्या मानवी दिनक्रमाची परिस्थिति पाहिली म्हणजे घड्याळाची ही सोबत किती अपरिहार्य ठरली आहे हें कळतें. झोंपेंत उशाशीं घड्याळ, जागेपणीं मनगटावर घड्याळ, पाण्यांत पोहतांना घड्याळ, विमानांत उडतांना घड्याळ अशी ही काळाची मानवाबरोबरची पदयात्रा पाहिली म्हणजे क्षणोक्षणीं 'आला क्षण, गेला क्षण' असें बजावणारीं हीं घड्याळें नश्वरतेची जाणीव करून देऊन, ऐन सुखांत माती कालवत आहेत असें वाटतें. ज्या अनंत व अमाप काळाच्या रहस्याकडे दुर्लक्ष करून आदिमानवानें आयुरारोग्य मिळवलें त्याच काळानें मायावी रूपें धारण करून आजच्या मानवाला जखडून अल्पायुषी करून टाकलें आहे.

मानवी जीवनांत रुक्षता व यांत्रिकता निर्माण करणारा दुसरा शोध म्हणजे वेळापत्रकाचा. अभ्यासाचें वेळापत्रक, आगगाडीचें वेळापत्रक, ट्रॅम बसचें वेळापत्रक इत्यादि परंपरेंत जीवनाचें वेळापत्रकहि आपोआप तयार होऊं लागलें आहे. माझ्या एका मित्रानें आत्मोन्नतीसाठीं 'यशस्वी जीवन' हा ग्रंथ विकत घेतला आहे. एकदां तो चाळतां चाळतां त्यांत वेळापत्रकाच्या महतीचें प्रकरण सहज वाचलें. लेखकाच्या मतें उत्कर्षासाठीं नुसता उत्साह असून भागणार नव्हता. त्याच्या जोडीला अविरत उद्योगाचें पाठबळ असायला हवें. आणि हा उद्योगही शिस्तबद्ध वेळापत्रकाप्रमाणें वेळच्या वेळीं करणें प्राप्त होतें. प्रथम इच्छुकानें ध्येयनिश्चिती करायची. मग किती वर्षांत ध्येयप्राप्ति करायची तें ठरवायचे आणि त्यानंतर इष्ट काळखंडाचे पंचवार्षिक, वार्षिक, षण्मासिक, त्रैमासिक, मासिक, साप्ताहिक वैं दैनिक असे पोटविभाग पाहून त्या त्या विशिष्ट कालविभागासाठीं वेळापत्रक तयार करायचे आणि त्याप्रमाणे यशोमंदिराचा मार्ग हळूहळू आक्रमत जायची. सकाळीं उठल्यानंतर उत्कर्षाचा मंत्र म्हणायचा, चालतांना, वाहनांत बसतांना प्रत्येक श्वासाबरोबर छाती फुगवून 'मी वेळच्यावेळीं काम करीत आहें; माझी ध्येयाकडे प्रगति होत आहे' असं मनाला बजावून सांगायचे, ह्या निदिध्यासाने आणि उत्कर्षमंत्रीनें भारावलेल्या माझ्या त्या मित्राला वेळच्या वेळीं काम करण्याचे— निदान त्यांचं वेळापत्रक करण्याचे वेड फार आहे. भिंतीवरील स्फूर्तिदायक वचनें, इष्टदेवतेच्या प्रतिमा आणि जागोजागीं ठेवलेल्या

---

( पान ३६ वरून चालू )

तीव्र होती. इथ घामाच्या धारा निथळायला लागल्या ! अंगाला चटके बसल्यासारखे वाटूं लागले पण माझी हास्य-मुद्रा मी कायम ठेवली कशी कुणास ठाऊक मला तात्यांची आठवण झाली. अंदमानच्या त्या भयानक कोठडींत ज्यानीं वेडरपणें बारीचावाशीं मुकाबला कैक वर्षे दिला अन् मला इथं पांच मिनिटं काढवत नाहींत. हास्य फुललें. पांच मिनिटं काय—पांच तास या बाष्पीभूत कोलूवर मी रिंगण धरलं असतं !

येथून दुसऱ्या खोलींत. इथं एका फवाऱ्या खालीं पुनश्च स्नान केलं ! एका जर्मननं मला टेबलावर झोपविलं व साबू लावून अक्षरशः माझ्या देहाला खरारा केला ! अश्वमेध यज्ञ आम्हीं करूं शकलों नाहीं म्हणूनच कीं काय क्षणभर कां होईना आम्हीं अश्वमय झालो ! चला ! उठा ! पुनश्च स्नान ! पुनश्च फवाऱ्याखालीं गेलो ! सबंध साबणाचा फेस देहापासून दुरावला !

आणखी एक जर्मन आला ! पुनश्च स्नान. गार पाण्याच्या फवाऱ्याखालीं मला उभा केला. पाणी बर्फासारखं गार होतं. इतकीं उष्ण स्नानं झाल्यावर हा गारवा जरा जादाच वाटला ! अंग शहारलं ! शाळूसारखे अंगावर कांटे असते व अंग इतक्या जोरानं हिंदडलं असतं तर शंभरास माणसं मरतीं !

दुसरा एक जर्मन आला त्यानं बरोबर एक मोठा टॉवेल आणला होता. त्यानं मला टॉवेलनं लपेटलं व साफ पुसून काढला. संपला वाटतं स्पेशल बाथ ! नाहीं "Next room please" पुढच्या खोलींत जा !" मी निमूटपणें आंत गेलों. "Lie down please." हें उंच गोरापान जर्मन म्हणाला, अहमादिक, झोपले. त्यानं तेलानं मर्दन केलं. सबंध देहाला तैलस्नान झालं. मग त्यानं कसलीशी पावडर लावली व मोडक्या इंग्रजींत हंसून तो पुन्हां मला म्हणाला, "your body hard !" ("तुमचा देह चांगलाच टणक कीं हो आहे !)"

पुढं सरलों, आतां-तुम्ही नंबर पांच, सहा व सात ह्या कुंडांत डुबायचं—दहा, दहा मिनिटं व नतर संपला आपला स्पेशल बाथ—पांच नंबरचा हौद सुंदर होता. निसर्गदत्त गरम पाणी वेताचंच गरम होत. चार जर्मन त्या हौदांतल्या संगमरवरी फरशीवर प्रचंड पांढऱ्या बेडकासारखे पसरले होते. मी सुद्धां डुंबकलो ! नंतर नं. ६ व ७.

खूप खूप हलकं वाटलं ! देहाला विसावा मिळाला होता. नस अन् नस शेकून निघाली होती. मज्जातंतूंना विरंगुळा मिळाला होता. दिवाळीच्या अभ्यंगस्नानाचं मांगल्य यांत नसलं तरी हे एक अभूतपूर्व-राजा गोपीचंद थाटाचं स्नान होतं व तें मला अनुभवण्याला मिळालं हें माझं मी भाग्य समजतो. सर्वांत मोठं भाग्य हें की स्त्री-पुरुषांचीं हीं स्नानं अगदी 'वेगळीं' असतात—दोन भागच वेगळे !!!









घड्याळांनीं त्याची खोली कशी एखाद्या प्रयोग शाळेसारखी वाटते. त्याच्या कॉटच्या उशाशीं ठळक अक्षरांत लिहिलेल्या कांहीं स्फूर्तिदायक काव्यपंक्ति मला आठवतात—

मना त्वां पहाटे सहाला उठावें ।
दहाच्या टकोऱ्या न्याहारीस जावें ॥
सहा वाजतां भोजना संपवोनी ।
दहाच्या क्षणीं त्वां पडावें बिछानीं ॥
अशा जीवना त्वां सदा आचरोनी ।
जगावें दहाच्या दहाला गुणोनी ॥

वेळच्या वेळीं कार्यरत होऊन दीर्घायुष्य संपादण्याचा मनास उपदेश करणारे हे काव्य 'नेमियेल्या वेळीं शाळेमध्यें जावें' ह्या आर्ष काव्याइतकेंच स्फूर्तिदायक असूनही हा माझा मित्र मन्या गेलीं कित्येक वर्षें पोस्टांतल्या खिडकीमागे तिकिटे विकत, पोस्ट मास्तर होण्याची ईर्षा बाळगून आहे.

ह्या उलट माझ्या दुसऱ्या एका अभ्यासू मित्राची तऱ्हा पहा. त्याला ग्रंथांचे व वाचनाचें अतिशय वेड. ह्या वेडापायीं त्यानं रात्री जागवल्या, प्रकृति बिघडवून घेतली आणि उपासही काढिले. पण त्याचा बोलका स्वभाव वाचनांतल्यां माहितीचा भडिमार आणि एकंदरींत समाधानी वृत्ति पाहिली म्हणजे व्यवस्थितपणा व वक्तशीरपणा ह्यांची महति कशी फोल आहे तें पटते. हा माझा मित्र अगदींच गबाळ आहे. किंबहुना गबाळग्रंथी हा शब्द जणुं त्याच्याचसाठीं निर्माण झाला आहे असे वाटते. त्याच्या ग्रंथांचे ढीग अस्ताव्यस्तपणें खोलीभर पसरलेले आढळतात. लिहिण्याच्या टेबलावर, बसायच्या खुर्च्यांवर, खोलींतल्या फळ्यांवर आणि इतस्ततः जमिनीवर विखुरलेले त्याचे ग्रंथ पाहिले म्हणजे दुसऱ्या महायुद्धांत घरोघरीं रचलेल्या A. R. P. च्या वाळूंच्या पोत्यांची आठवण येते. अज्ञानाचा हल्ला चुकविण्यासाठीं जणूं त्यानं हे ढीग रचले आहेत असे वाटते. असा हा ग्रंथांचा डोंगर उलथापालथा करण्याच्या खटपटींत तो असतांना एकदां मी त्याच्याकडे गेलों होतों. पुस्तकें उपसून तो कांहींतरी शोधत होता. माझ्या अस्तित्वाची त्याला जणूं जाणीवही नव्हती. अखेरीस कांहीं वेळानें त्या ढिगाऱ्यांतून हवे होते ते पुस्तक त्याला सांपडले आणि हर्षित स्वरांत तो बोलला.

"पहा केव्हांपासून हें पुस्तक हुडकित होतों. तें अखेरीस सांपडले. आणि त्याबरोबर ही दुसरीहि सवडीनं वाचण्यासाठीं ठेवलेलीं पुस्तकेंहि मिळालीं!" "अरे, पण ह्या उलथापालथींत तुझा किती वेळ फुकट गेला आणि हीं सर्व उपसलेलीं पुस्तकें पुन्हां लावण्यांत आणखीं जास्त फुकट जाणार. त्यापेक्षां वेळच्या वेळींच नीट लावलीं असतीस तर?" मी म्हणालों.

एकदम तो म्हणाला, "तूं कधीं शिकार केली आहेस?"

"छे बुवा! आपल्याला तसला नाद नाहीं."

"शिकाऱ्याला खरा आनंद शिकारीसाठीं पायपीट करण्यांतच होत असतो. सावजासाठीं घामाघूम झाल्यानंतर तें अचानक गवसलं गेलं आणि त्याची शिकार झाली तरच त्या शिकारींत खरी गम्मत. हीं माझीं पुस्तकं मी वेळच्यावेळीं जाग्यावर ठेवलीं असतीं तर मला हवं तें पुस्तक चटकन मिळाले असते हे खरें पण मग सावज हेरण्याच्या आणि तें

[ पान ५६ वर चालू ]











( पान १५ वरून चालू )

बाजाराहून भरत येतांना आडरानांत केळपान्यानं बायला मुरडून टाकलं. मरायचीच. पण प्रसंगाला देवा भूत्या उभा राहिला. त्यानंच बायचा बेशुद्ध मुडदा पाठंगुळी मारून घरीं नेऊन टाकला.

कित्येक दिवस बाय अंथरुणाला खिळून होती. आपल्या खोपटांत मोडून पडली होती.

गांवांत लोकं मात्र काय वाटेल तें बोलत सुटलीं होतीं. विचार करायचं त्यांचं कारण नव्हतं. कारण इतके दिवस त्यांनी दुसरं कांहींच केलं नव्हतं. बघून कोणाडोळा केला होता. ऐकून कानावर हात ठेवले होते. आतां तोंडावर हात ठेवून ते बोंब मारीत होते...

आणि तसा मग एक दिवस पोलीस पाटील पंचनाम्याच्या तयारीनं बायच्या खोपटांत शिरला. जगन्नाथ पुराणिक बरोबर होताच. तात्या घरीं नसल्यामुळें मला त्यांच्याबरोबर जावं लागलं.

नशिब माझं ! माझी इच्छा नव्हती. बिलकूल इच्छा नव्हती. माझ्या हृदयांतील गाजराची पुंगी कधींच वाजेनाशी झालेली. उगाच कटकट नको म्हणून मोडून तोडून तिचे तुकडे तुकडे केले होते मी. आणि आंतल्या आंत चघळत होतों...नाहीं तरी दुसरा काय उपाय होता. बाय जन्माची लुळी पांगळी झाली होती आणि देवा भूत्या छान काळजी घेत होता.

बायच्या खोपटाचं दार उघडंच होतं. पुढच्या दारीं आमची चाहूल लागतांच बायनं आंतून विचारलं, " कोन हाय र ! "

तिची म्हातारी घरीं नव्हती वाटतं !

" मी पोलीस पाटील. सरकारी चौकशीला आलों हाय. " पोलिस पाटलानं तिऱ्हाइतपणं सांगितलं.

तशी काठी टेकत बाय दारापाशीं आली. आम्हाला बघून आपल्याशींच पुटपुटली, " चौकशी. "

या असल्या कामांत पोलिस पाटलाचा उत्साह नेहमींच शिगेला पोंचलेला असायचा. घोगऱ्या आवाजांत तो जगन्नाथ पुराणिकावर ओरडला, " डाक्तुरा, अरं बघतूस काय ? लाग तुज्या उद्योगाला. मी करतूं बाकी तपासणी. "

आणि त्याची तीक्ष्ण नजर खोपटांत इकडे तिकडे फिरूं लागली. शेणानं सारवलेल्या जमिनीवर नव्यानं कुठं माती पडली आहे का म्हणून तो बघूं लागला. चांदीच्या मुठीचा दांडा ठोकत तपास करूं लागला. ओटीवर, माजघरांत आणि मग तो स्वैंपाक घरांत शिरला.

आणि तेव्हां पुराणिक डॉक्टर बायला म्हणाला, " आंत चल तुला तपासायचं आहे मला. "

" इथं भाइरच होऊं दे तपासणी." बाय खिन्नपणं हंसली आणि माझ्याकडे बघून ती शून्यपणं म्हणाली, " होऱ्याच म्होरं होऊं दे."

" इथं उघड्यावर ! " जगन्नाथानं विचारलं.

" कार ? व्हयंल काय ? लाजतूस ? "

" मला कसली लाज ! "

" खरं. लाज नाय तूज. आन् म्हून तर आलास. तुज नाय तशीच ह्येलाबी नाय. तुमा कोनालाच लाजा ऱ्हायल्या नायत. आन् ह्यें देखून मी पुन लाज सोडून दिली. ही बग...बग. बग र माज्याकडं आन् नुसता बगत ऱ्हायलास काय म्हून. अर रांड नाय मी तुजी...कर...तपासणी कर. ह्यो चेरा, ही छाती, हें पोट – पुराणिका बाळंतीणीचं हाय का र ह्यं ? इचारांत नग पडूं बाबा. डाक्तूर हायस तूं. तुज कळाया होवं. " बाय बेफाम झाली होती. वेडीपिशी झाली होती. तिला शुद्ध नव्हती. बुद्ध नव्हती.

आंत माजघरांत तिचं हें बेताल भाषण कानावर गेलं आणि तसा पोलीसपाटील स्वैंपाक घरांतून तावातावानं बाहेर आला. बायची ती अवस्था बघून त्याचेहि डोळे पांढरे व्हायची वेळ आली. जीभ टाळ्यालाच चिकटून बसली.

आणि तशी बाय जोरानं हंसली. हंसतच राहिली. आणि हंसतां हंसतां रडूं लागली. सांगूं लागली, " पोलीस पाटला, काय काळजी करूं नग. माज्यापासून गांवाला भेय नाय आतां. यापुडं बायकडे कोन नाय बघनार. आतां ह्या बायचं मढंच ऱ्हानार. तिच्या शरीराचा चोळामोळा झाला हाय. जिवाच्या चिंध्या झाल्या आहेत. ह्यें कसं जालं ? काय जालं म्हून पुसूं नग...नग पुसूं. इस्वास नाय बसनार गांवाचा. आडरानांत केळपान्यानं नाय मुरडली मस. मुरडली माज्या नोबऱ्यानं आणि त्येच्या सौंगड्यांनीं..."

—दहा, नाहीं बारा वर्षं झालीं असतील !

अनुभवाच्या खातेवहींत ह्या प्रसंगाची नोंद कुठल्या बाजूला करायची याचा अद्याप मला उलगडा झालेला नाहीं.

• • •

---

( पान ४२ वरून चालू )

वैजयंतीला दुसरें तिसरें वेड कांहीं नाहीं ! तिला ही खात्री मात्र आहे कीं आपल्या मनाच्या कप्प्यांत दडलेली सूस सूडाची वाईट इच्छा पूर्ण झाली आहे. आपल्यामुळेंच आईचा सुंदर चेहरा काळ्या कोडानें काळा ठिक्कर पडला आहे ! त्या आठवणीनें तिचें अंतःकरण शरमेनें, आईविषयींच्या कीवेनें भरून येते ! ती नकोशी भावना तिला आवडत नाहीं ! आणि तिच्या डोळ्यांसमोर पुन्हां एकवार तें काळें तोंड दिसतें, आणि घशांत किंकाळी गुदमरते.

डॉक्टर मात्र आशा देतात कीं हें तिचं वेड किशोरावस्था सरली कीं जाईल म्हणून ! ह्या वयांत भावनांचा असाच गोंधळ उडतो, असें ते म्हणतात. सामाजिक संक्रमणावस्थेला नांवें ठेवतात !










# राऊंड द विकेट



दि. श्री. कराडकर

आठवतंय् तेवढं सांगतों...

'मिड्लसेक्सचे जुळें' म्हणून प्रख्यात असलेल्या कॉम्प्टनएड्रिच ह्या जोडीपैकीं कॉम्प्टननें End of An Innings हे पुस्तक लिहून कीर्ति पुष्कळ मिळविली आणि बऱ्याच जणांना ठपकाहि दिला. रस्त्यांतून दरवेशी अस्वल नेऊं लागला कीं लोक कुतूहलानें त्या अस्वलाकडे बघतात त्याप्रमाणें रस्त्यांतून जुळें जाऊं लागले कीं लोक टकमका त्यांच्याकडे बघतात. कां कोणास ठाऊक ? जुळें सगळ्या गोष्टी सारख्या करतात पण मला वाटतं त्यांनीं आपआपसांत कामं वाटून घेतली तर फार बहार होईल. सकाळीं एकानें दोघांऐवजी जेवायचं, संध्याकाळीं दुसऱ्यानं दोघांच्या अन्नाचा फडशा उडवायचा, एकानें कर्ज करायचं, दुसऱ्यानं फेडायचं ! एकानें फक्त लग्न करायचं, दुसऱ्यानें पोरांचं 'तीर्थरूप' पद माथी घ्यायचं ! एकानं फक्त हंसण्याचं काम करायचं, तर शोकप्रसंगी वगैरे रडण्याचं काम दुसऱ्याचं ! परंतु हे असं नाहीं. त्यांचं बघणं, वागणं, करणं सगळं कसं अगदीं इस्त्रीबंद ! ! म्हणूनच लेखक व्हायचा एड्रिच तेवढा राहिला व त्यानें Round the wicket हे पुस्तक लिहून कॉम्प्टनला गांठलं. दोनशे पानांच्या ह्या पुस्तकाचे दोन भाग पडले आहेत. पूर्वभाग आत्मचरित्रवजा मजकूर लिहिण्यांत खर्ची घातला आहे तर पुस्तकाच्या उत्तरभागांत १९५८-५९ सालीं इंग्लंड–ऑस्ट्रेलिया यांच्यांत ऑस्ट्रेलियाला जे कसोटी सामने झाले त्यावर रसग्रहणात्मक भाष्य केलं आहे. त्या सामन्यांचीं 'चक्षुर्वैसत्यं' अशी ही हकीगत असल्यामुळें त्यचे हे भाष्य किचकट न होता चटकदार झालं आहे.

मात्र पूर्वार्धांत आत्मचरित्र सांगतांना बिलनें एकसूत्रता राखलेली नाहीं. नातवांनीं आजोबांभोंवतीं गर्दी करून त्यांनां म्हणावं, 'आम्हांला खूप खूप गोष्टी सांगा हं.' मग आजोबांनीं म्हणावं, 'सांगतो हं. पण मुलांनों आठवतंय् तेवढं सांगतो.' तसं इथें लेखकाचं झालं आहे. जसं आठवत गेलं तसं तो लिहित गेला. त्याच्या ऑस्ट्रेलियाबद्दलच्या आठवणींनीं इतकीं गर्दी केली आहे कीं भारत, वेस्टइंडिज ह्या देशांबाबत त्यानें तुरळक उल्लेख केलेले आहेत आणि ह्या आठवणी लिहितांना तो इतका तल्लीन होऊन गेला आहे कीं स्वतःबद्दलची माहिती लिहिण्याची त्याला पुस्तकाच्या मध्यंतरी आठवण झाली !

म्हणूनच पुस्तकाचा परिचयसुद्धां बिलच्या ह्या 'आजोबा' पद्धतीप्रमाणें करून देणं जास्त खुमारीचं ठरणार आहे.

ह्या पुस्तकांतील 'जुन्या आणि जाणत्या खेळाडूंचं' व्यक्तिदर्शन बहारीचं वठलं आहे. कीथ मिलरची व बिलची प्रथम ओळख केवळ योगायोगानें झाली. युद्धकाळांत वैमानिक असलेला बिल मधून मधून 'न धरी शस्त्र करी मीं' म्हणून बॅट हातीं घेई. त्यावेळीं मिलरही सामने खेळावयास येई पण लांब केस असलेल्या ह्या आडदांड ऑस्ट्रेलियन त्याला आकर्षू शकली नाहीं. खुद्द अंगावर आर्ची फॉइलर जेव्हां 'हा फार वेगवान आहे हं ? मी त्याला नेट प्रॅक्टिसच्या वेळीं पाहिला. भयंकर वेगवान बुवा' असं अंगावर शहारे आणून सांगूं लागला तेव्हां कुठे मिलरकडे त्याचे लक्ष गेलें एवढंच नाहींतर त्याच्याकडून पहिलं षटक खेळतांना फॉइलरचं सगळं वर्णन खरं असल्याचं त्याला समजूं लागलं.

हेंच समजूं लागलं असं नाहीं तर सर डोनाल्ड ब्रॅडमन व वॉल्टर हॅमंड 'हम भी कुछ कम नहीं' असं म्हणत जणूंकाय बिलभोंवतीं फेर धरूं लागले. ते त्याच्या नजरेसमोर इतके येऊं लागले कीं त्या दोघांचं मार्मिक व्यक्तिरेखाटन करून त्यांना त्यानें गप्प केलें ! माणसाचा स्वभाव परिस्थितीनें बदलतो हे हॅमंडच्या बाबतींत खरं झालं इतकं कीं आईचं ऐकणारा मुलगा लग्नानंतर चक्क बायकोची जीन व विचार घेऊन बोलूं लागतो तितकं ! युद्धाशीं जणूंकाय हॅमंडचं लग्न झालं ! कारण युद्धपूर्वीचा हॅमंड युद्धानंतर पार बदलला. त्याचा 'डबल रोल' सुरू झाला. जुना हॅमंड विचारी होता, खेळाडूंवर आईप्रमाणें माया करायचा, बायकोच्या आस्थेनें 'हवं, नको' विचारायचा व वडिलांना मदत करणाऱ्या मुलाची तत्परता दाखवायचा ! पण नवा हॅमंड विक्षिप्त सर्व






सोडोनी द्यावे ' म्हणणारा होता. खेळाडूंवर तो बापाप्रमाणे डोळे वटारी, ' आज गडे तुम्हीच स्वयंपाक करा, मला नखं कापायची आहेत. ' असं नवरोजीला फर्मावणाऱ्या आधुनिक बायकोचा उद्धटपणा घेऊन आला. व ' शट् अप्. तुम्हांला कांहीं समजत नाहीं. कंडम आहांत तुम्ही ! ' असं तीर्थरूपांना सुनावणाऱ्या हल्लीच्या मुलाची आगाऊ व तुसडी वृत्ति घेऊन आला होता. युद्धानंतर ऑस्ट्रेलियाला गेलेल्या इंग्लंडच्या संघाचं नेतृत्व हॅमंडकडे होतं; पण हॅमंडच्या पालटलेल्या वृत्तीमुळें ऑस्ट्रेलिया संघ भराभर सामने जिंकू लागला. इंग्लंडची संघशक्ति विस्कळित झाली. जुना हॅमंड असता तर विजय मिळविण्यासाठीं इंच इंच लढला असता !

स्वतःला आलेल्या हॅमंडच्या अनुभवाबाबत तो आपुलकीनें लिहितो, " पहिल्यापासून हॅमंडची माझ्यावर ' लई माया ' होती. दक्षिण आफ्रिकेशीं शेवटचा सामना खेळेपर्यंत कमनशिबी रणा आणि मी जिगर दोस्त होतो ! ह्या शेवटच्या सामन्यांतही पहिल्या डावांत अवघी एक धांव काढून मी बाद झालों. दुसरा डाव इंग्लंडनें सुरू केला तेव्हां सामना जिंकण्यासाठीं इंग्लंडला ६९६ धांवांची गरज होती. ' सीदन्ती मम गात्राणि ' अशी माझी स्थिति झाली होती. बॅटला दोन्ही कोपरांपासून घवघवीत नमस्कार केला व ' तूंच वांचव ' म्हणून गजेंद्राच्या भक्तिभावानें तिला आळवलें. आणि काय आश्चर्य ? हॅमंडनें माझ्याजवळ येऊन मला धीर दिला व मला ' तिसरा फलदाज ' म्हणून पाठवलें. इंग्लंडच्या संघांतील गर्भगळीत झालेल्या खेळाडूंना, " घाबरतां काय. माझा ताना पडला तरी मी आहे ना ? नेटानें लढत द्या. बोला, ' हरहर महादेव ! ' असा शेलारमामाचा आव आणीत बिल एका हातांत बॅट फिरवीत ' पॅव्हीलिअन ' च्या ' बिळां'तून बाहेर पडला ! आणि २१९ धांवा काढून त्यानें झुंजार लढत दिली.

युद्धानंतर बोलका हॅमंड मुका कसा झाला ह्याचं एकच उदाहरण पुरे. ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर असतांना हटन व वॉशब्रुक ह्यांना त्यानें एकदां आपल्याबरोबर मोटारीतून फिरावयास नेलें. खूप दूरवरचा प्रवास त्यांनीं केला. रस्त्यांत एके ठिकाणीं पेट्रोल भरून घेण्यासाठीं ते थांबले. बाकी सारा वेळ ते मोटारीतच होते परंतु ह्या सफरींत हॅमंड एक चकार शब्दानेंही त्या दोघांशीं बोलला नाहीं ! घुम्या हॅमंड ! ! वेड्या माणसाची संगती परवडली पण घुमा माणूस नको. तो शहाण्याला वेडा करेल ! ! सामने खेळतांनाही तो कोणाला उत्तेजन देत नसे. उलट बेपर्वाईनें म्हणे, " The state matches are to be used as practice for batsmen. The results are not important. " एखाद्या सेनापतीनें आपल्या सैन्याला फर्मावावें, " शत्रूचें सैन्य मारूं नका तर राजाला मारा " पण सैन्य मारल्याशिवाय राजा हाती कसा लागेल ? म्हणजे सेनापतीचा हा हुकूम व हॅमंडचा वरील उपदेश हे एकाच जातींतले ! परंतु हॅमंड हा असा विचित्र कां वागूं लागला ? पेटीतून निघणारे सूर, बदसूर कसे निघूं लागले ? अनेक कारणांपैकी एक कारण असंही असूं शकेल कीं त्यावेळेस तो ' घटस्फोट ' वगैरेच्या खाजगी भानगडींत गुंतला होता. असं म्हणतात.

हॅमंडच्या अगदीं उलट ब्रॅडमन होता. हॅमंड घसरूं लागला तर ब्रॅडमन चढूं लागला. हॅमंडच्या तेजानें सूर्याचं रूप टाकून काजव्याचं रूप घेतलं तर ब्रॅडमनच्या तेजानें सुदर्शनचक्राचं रूप धारण केलं ! वास्तविक पाहतां दोघेही एकाच काळीं उदयास आले. मग हे असं का व्हावं ? यावर एवढंच म्हणतां येईल कीं बरोबर वर्गात दाखल होऊन एकाच, पहिला तर दुसऱ्याचा शेवट नंबर यावा तसं हे झालं. मग त्या दुसऱ्याच्या मनांत पहिल्याबद्दल जी एक असूया निर्माण होते तीच गत हॅमंडची झाली. युद्धानंतर ब्रॅडमन जास्तच कौशल्यानें खेळत असलेला पाहून तो त्याच्यावर चिडे. त्याचा प्रत्येक फटका हॅमंडला दोषपूर्ण वाटे. एखाद्या दशग्रंथी ब्राह्मणानें नुकतीच ब्राह्मणकी करूं लागलेल्या इसमास म्हणावें, ' शिचो, तुला काय येतंय अजून ? तो रुद्र घोटीत बैस जा ! ' ह्याच कुत्सितवृत्तीनें हॅमंड ब्रॅडमनबद्दल बोलूं लागला. ब्रॅडमनचा एक दुर्गुण मात्र मान्य करायला हवा तो हा कीं ज्या नियमांचा तो पाठपुरावा करी ते नियम प्रति–संघाला लावण्यांत तो खूप असे पण तेच नियम त्याच्या संघाला विजयासाठी डोईजड होऊं लागले कीं तो भडके. विनाकारण. चारचौघांत बायकोनें अक्कल काढल्यामुळें भडकणाऱ्या नवऱ्यासारखा ! ' बायकोनें कांहीही बोलावं, कांहीही करावं पण आपली अक्कल काढूं नये असं प्रत्येक नवऱ्याला प्रामाणिकपणें वाटत. हाच ' प्रामाणिकपणा ' ब्रॅडमनला मान्य होता; नियम तुम्हांला, मला नाहीं ! हे त्याचं तत्व असे. त्याचं व मिलरचं कधींच पटलं नाहीं. स्वतःच्या तंत्रानें खेळणाऱ्या मिलरला ब्रॅडमनच्या अव्यवहार्य सूचना कधींच पटल्या नाहींत. परंतु म्हणून कांहीं नळावर भांडणाऱ्या बायकांप्रमाणें क्रीडांगणावर ते कधीं अद्वातद्वा भांडले नाहीत. मिलर तर उपहासानें म्हणे, ' आपल्याला ह्या Little man शीं भांडायला वेळ नाहीं बुवा ! ' ब्रॅडमनला नेहमी तो Little Man म्हणत असे. १९५७-५८ च्या दक्षिण आफ्रिकेच्या दौऱ्यांत मिलरला वगळण्यांत आलें. ह्याला कारण ब्रॅडमन त्यावेळीं निवड-समितींत होता हे असूं शकेल काय ?

मिलरप्रमाणेंच स्टॅन मॅक्केब व जॅक फिंगल्टन ह्या दोघांशीं ब्रॅडमनचं जमत नसे. फिंगल्टन हा तर खुमासदार शैली असलेला एक पत्रकार होता. त्यामुळें ब्रॅडमनवर तो वेळोवेळीं टीका करीत असे. ह्या टीकेची त्याला चीड येई. परंतु मुख्य कारण म्हणजे स्टॅन व जॅक हे दोघेही ' टायगर ' ओरेलिचे जानी दोस्त होते ! ग्यानबाची मेख येथेंच होती. कारण १९३७ नंतर खेळाव्यतिरिक्त ब्रॅडमन व ओरेलि एकमेकांशी कधींही बोलले नाहींत. कधीं रस्त्यांत एकमेकाला दिसले तर मांजर आडवं यावं त्याप्रमाणें दोघेही पाठ फिरवून माघारी चालूं लागत ! १९३६ सालीं इंग्लंडच्या दौऱ्यावर असतांना त्या दोघांचं शिस्तभंगाबाबत कडाडून भांडण झालं होतं. ह्या प्रसंगानंतर त्या दोघांचं बिनसलं.

' आजोबा, राजाबद्दल तर तुम्हीं कांहींच सांगितलं नाहीं ! ' असं म्हणून राक्षसाच्या गोष्टी सांगण्यांत रंगलेल्या आजोबांना मुलं राजाची जशी आठवण करून देतात व ' खरंच कीं रे राजा राहिलाच ! ' असं म्हणत आजोबा राजाबद्दल सांगूं लागतात त्याचप्रमाणें

अनुक्रमणिका






'अरेच्या हटन राहिलाच!' म्हणून बिलसाहेब एकदम हटनकडे वळले आहेत. इंग्लंडच्या ह्या माजी कप्तानाबद्दल फारच थोड्यांनीं विपुल लिहिलं आहे. त्यामुळें एड्रिचनें लिहिलेला प्रत्येक शब्द न् शब्द वाचनीय ठरला आहे. एके ठिकाणीं तो आदरानें लिहितो, "फलंदाज म्हणून हटनची योग्यता असामान्य आहे; पण कप्तान म्हणून त्याची योग्यता अगदींच सामान्य आहे." कप्तान म्हणून हटन चमकूं शकला नाहीं ह्याला कारण त्याची कप्तानपदाची विचित्र कल्पना असावी काय? त्याला वाटे कप्तानानें सगळी जबाबदारी अंगावर सांभाळावी व तशी तो सगळी जबाबदारी आपल्या शिरावर घेई. त्याच्या ह्या अशा आवाक्याबाहेरच्या जबाबदारीमुळेंच 'क्रिकेटर' म्हणून त्याच्या कीर्तीला धक्का बसला. त्याची नाजूक तब्येत अधिकच ढांसळली; आणि आणखी दोन-तीन वर्षांनंतर निवृत्त होण्याऐवजी तो दोन-तीन वर्षें आधीच निवृत्त झाला. जणूंकाय अकाली वृद्ध झाला तो! हटन फार लवकर 'नर्व्हस' व्हायचा. त्याचा स्वभाव मात्र घुमा. अनेक गोष्टी मनांत ठेवून स्वतःच्या मनाचा तो कोंडमारा करून घ्यायचा. त्याच्या असल्या ह्या घुम्या स्वभावाबद्दल एड्रिचनें एकदां त्याला चक्क हटकलें, "हें काय रे लेन? सगळ्या गोष्टी सांगून मोकळा होत जा बघूं तूं." पण 'मूळ स्वभाव जाईना' हेंच खरं. स्वतःच्या मतप्रणालीबद्दल तो इतका साशंक असे कीं कुठल्याहि गोष्टीचं तो लागलीच निराकरण करून घेई. कसोटी सामन्यासाठीं संघ निवडल्यानंतर सामना सुरूं होण्याआधीं आदल्या रात्रीं तो एड्रिचकडे येऊन त्याला विचारी, 'बिल, आपण उद्यांसाठीं योग्य संघ निवडला आहे ना?' झोपमोड झालेला बिल मग त्याला वैतागानें म्हणे, "हो, हो. झोप बाबा तूं आतां!" पण तरीही हटन निवांतपणें झोपी जात नसावा. तो संवयीचा सच्चा सेवक होता! नेहमीं आदतसे मजबूर!! त्याच्या संवयीची ही एक गोष्ट पहा. १९५४-५५ सालीं इंग्लंडचा संघ त्याच्या नेतृत्वाखाली ऑस्ट्रेलियाला जात असतांना फ्रेडी ब्रॉऊन मॅनेजर म्हणून काम पहात होता. पूर्वी ब्राऊनच्या हाताखाली खेळल्यामुळें हटन त्याला skippers अशी हांक मारी. हे पाहून एड्रिच लेनला म्हणाला, "लेन, कृपाकरून ब्राऊनला skipper अशी हांक नको मारूंस. ह्या बोटींत फक्त दोनच skippers आहेत. एक तूं आणि दुसरा बोटीचा!"

बिलनें हटनचा अगदीं पिच्छाच पुरवायचा ठरविला आहे. कारण कप्तान म्हणून लेनमध्यें असलेल्या तीन दोषांचं त्यानें मार्मिकपणें विवरण केलं आहे. मिळूनमिसळून वागणें हे लेनच्या स्वभावांत नव्हतं. दुसरं म्हणजे संघामध्यें असलेल्या प्रत्येक खेळाडूचे व्यक्तिमत्व त्याला अजमावतां येत नसे. आणि तिसरा दोष, स्वतःच्या संघाविरुद्ध बाजू होत चालली आहे असं पाहिल्यावर यशासाठीं ज्या गोष्टी करावयाच्या असतात त्या तो फार मंदगतीनें करीत असे. हे तिन्ही दोष उदाहरणें देऊन एखाद्या वकिलाप्रमाणें बिलनें पटवून दिले आहेत व 'बोला काय म्हणणं आहे आतां?' असं जणूं काय त्यानें आव्हान दिलं आहे.

पण बिलचं हे आव्हान डेनिस कॉम्प्टन स्वीकारायला आला. परंतु निराळ्या अर्थानें. इंग्लंडनें ज्यावेळेस ठरविलं कीं एखादा धंदेवाईक खेळाडू कप्तान असणं जरूरीचं आहे त्यावेळी कप्तानपदासाठीं हटनला एकच प्रतिस्पर्धी होता. तो म्हणजे–डेनिस कॉम्प्टन! हंसरा, आनंदी, चपळ डेनिस 'आमचं बी कुठं जमलं तर बघा!' म्हणून कप्तानपदासाठीं अर्ज घेऊन उभा होता. परंतु तो कप्तान होऊं शकला नाहीं. मुख्य कारण हे होतं कीं कप्तानपदाच्या ओझ्याखाली तो तडफदारपणें खेळत नसे व दुसरं म्हणजे त्याची गुडघादुखी. स्वतःच्या मिड्लसेक्स ह्या परगण्याचाही तो कप्तान झाला नाहीं ह्याला कारण त्याचा गुडघा आडवा आला! याशिवाय त्याच्या कांहीं संवयी कप्तानपदाच्या आड आल्या असत्या त्या म्हणजे सामन्याला महाशय वेळेवर कधीं हजर राहणार नाहींत, नेहमीच उशीरा येतील. उशीरा येण्याबाबतची त्याची कारणं मजेशीर असत. कधीं त्याला वाटे कीं सामना साडेअकराऐवजी बारा वाजतां सुरूं होणार होता, कधीं रस्त्यांत मोटारच पंक्चर झाली, तर कधीं रस्त्यावर इतकी गर्दी होती कीं वाट काढणं मुष्किलीचं होई. एक ना दोन. अनेक कारणं तो पुढें करी.

इंग्लंडच्या सध्यांच्या क्रिकेट-क्षितीजावरील चंद्र-सूर्याबद्दल तर एड्रिचनें अजून कांहीं सांगितलेच नाहीं? हे चंद्र-सूर्य म्हणजे कोलीन काऊड्री व पीटर मे. काऊड्री म्हणजे कोजागिरीचा शांत पण प्रभावी चन्द्रमा तर पीटर मे प्रखर सूर्य असेल पण सध्यां तो 'पावसाळी सूर्य' बनला आहे. म्हणजे काय






की पावसाळ्यांत कितीक दिवस सूर्य म्हणून दिसत नाहीं. तसं सध्यां मेच झालं आहे. तो लुप्त झालेला आहे ! पण विलनें त्याच्याबद्दल सांगायला सुरवात केली कीं, "आधुनिक कसोटी सामन्याच्या कप्तानाला ज्या गुणांची आवश्यकता आहेत सर्व काऊड्रीमध्यें आहेत. ह्या उलट पीटर मेला कप्तानपदासाठीं खडतर तपश्चर्या करावी लागली होती. सरेचा कॅप्तान स्टुअर्ट सरीज व लेन हटन हे मे चे गुरु होत. ह्या दोन गुरुंशीं राहून पहिल्यापासून 'कांहीं झालं तरी जिंकायचंच' ही जिद्द तो शिकला. तर दुसऱ्यापासून 'विजय मिळविण्यासाठीं कितीही किंमत द्यावी लागली तरी पर्वा नाहीं' ही शिकवण तो शिकला. परंतु मेपेक्षां काऊड्रीमध्यें नैसर्गिक गुण आहेत. खेळाकडे पाहण्याची त्याची दृष्टि मे पेक्षां जास्त उत्साही आहे. थोडक्यांत "काऊड्री म्हणजे लिडसे हॅसेट आहे." ही काऊड्रीची स्तुति पटणारी आहे परंतु कांहीं ठिकाणीं त्याची केलेली स्तुति मुळींच पटणारी नाहीं. पैसे देऊन परिचय छापवून घेणाऱ्या शा. खिमजी भिमजीसारख्या व्यापाऱ्यासारखी वाटते !

टोपी डोक्यावर असायची आणि घरभर टोपी शोधीत गिल्ला करीत बसायच, 'अरे माझी टोपी कुठें आहे ?' आणि तो समोरचा माणूसहि त्याच्या गिल्ल्यामुळें इतका भांबावून गेलेला असतो कीं त्यालाहि ह्या माणसाच्या डोक्यावरील टोपी दिसत नाहीं व तोहि घरभर त्याच्याबरोबर टोपी शोधूं लागतो. शेवटीं डोक्यावरील टोपी दिसते तिसऱ्या माणसाला. म्हणजे ह्या लहानशा घटनेंत जो विनोद दडलेला आहे तोच एड्रिचच्या बाबतींत खरा ठरला आहे. तिसरा माणूस येऊन एड्रिचला जेव्हां सांगूं लागावा, 'अहो पण सगळें झालें. तुमच्याबद्दलची हकीकत कुठे आहे ?' तेव्हां दचकून 'खरंच कीं टोपी इथेंच आहे !' ह्या सुरांत एड्रिच ओरडतो, 'खरंच कीं ती इथेंच आहे !' व स्वतःबद्दल सांगूं लागतो, "१९५८ च्या ऑक्टोबरमध्यें मला Norfolk Country Cricket Club चे अध्यक्ष मायकेल फाल्कन यांचेकडून पत्र आलें कीं १९५९ सालीं "Minor Countries" चे मी नेतृत्व करावें. पीटर पॉवेल, ह्या सध्यांच्या कप्तानाबरोबर त्यांनीं बातचीत केली म्हणे. ही आयती चालून आलेली संधि पाहून मला आनंद झाला, कारण ह्यामुळें मला 'क्रिकेट' ह्या खेळांत राहतां येणार होतं व मुख्य म्हणजे ज्या भूमीच्या कुशींत मीं हुंदडलो, बागडलों त्या भूमीवर मला जायला मिळणार होतं. परंतु ज्या मिड्लसेक्सनें मला ३९ 'इंग्लिश टोप्या बहाल केल्या' त्या मिड्लसेक्सची ह्याबाबत परवानगी विचारणं माझं कर्तव्य होतं." माझी तर खात्री आहे कीं त्या ३९ टोप्या एकत्र करून एक छान झगा तयार होईल. पदवीदान समारंभाला घालतात तसा ! म्हणजे कुठेहीं मानाचे बोलावणें आले कीं विलसाहेब निघाले तो झगा घालून ! जाहीरातीपरी जाहिरात, कपड्यापरी कपडा !

मिड्लसेक्सनें उदार मनानें विलला परवानगी दिली. म्हणून आतां बिलच्या जन्मगांवी नॉरफोकला जाऊं. येतां ? चला तर. सुमारें तीस वर्षांपूर्वी नाविचच्या ब्रॅकन्डेल ह्या शाळेंत चिमुरड्या विलनें क्रिकेटचे धडे घेतले. त्याचे गुरु होते जॅक निकोलस. तो गोलंदाजी वेगांत टाकीत असे. अगदीं जोरांत...एकदां तर शाळेंतील एका सामन्यांत त्यानें १८ धांवांत १० बळी घेतले. १९३४ सालीं लॉर्डस् येथें "ट्रायल" साठीं तो गेला. उगवत्या काळाची नांदी सुरू झाली ! लॉर्डसवर रोनी ॲलडनें त्याची चांचणी घेतली. खूप वेळ खेळल्यावर रोनी त्याला म्हणाला, "I think you'll do my lad." पुढें विलचेच शब्द वाचा, "जेव्हां मीं माझ्या खोलीत गेलो तेव्हां असं मला आढळून आलं कीं माझे हातमोजे रक्तानें थोथबलेले आहेत ! माझा पंजा तर फाटला होता !" बकासुराचा वध करून आलेला भीमाचा अवतार त्यानें धारण केला होता. त्यानंतर विल झपझप पुढें जात चालला. ऑस्ट्रेलियाला गेला, ऑस्ट्रेलियाच्या चूलखंडांतून 'रक्षा' आणण्यास मदत केली, व एकूण त्यानें ८६ शतकें फडकावलीं !

...आणि एड्रिच झोपीं गेला !

१९५३ सालीं फेस्टीव्हल संघ वि. ऑस्ट्रेलिया हा सामना चालू होता. ऑस्ट्रेलिया फलंदाजी करीत होती व एड्रिच मिड् विकेटला क्षेत्ररक्षण करीत होता. इतक्यांत बॅट मोडली म्हणून जॅक हिल बदलण्याकरितां आंत गेला. हे पाहून विल खाली बसला व हिरव्यागार गवतावर पहुडला. रात्रीचं जागरण, थंडगार हवा ह्यामुळें तो तात्काळ झोपी गेला. इकडे हिल परत आला, एक चेंडू खेळला पण छे, एड्रिचचा अजगर झाला होता !

क्रिकेटमधील अनेक गंमती-जंमतींनीं हे पुस्तक खच्चून भरलं आहे. अगदीं उशींत शिवरीचा कापूस खच्चून भरावा तसं ! ह्यांतील एक एक गंमत तर फारच विनोदपूर्ण आहे. ती अशी, १९५३ सालीं ट्रेन्ट ब्रीज येथें ऑ. वि. इं. असा सामना चालू होता. डॉन टॅलन ऑस्ट्रेलिया-संघांत होता. डॉनला कमीं ऐकूं येत असल्यामुळें त्याचे मित्र त्याला Deafy अशी हांक मारीत. ऑस्ट्रेलियापुढें हा धावांचा डोंगर उभा होता व त्यांत भर म्हणून प्रकाशही अंधूक झाला होता. जेव्हां टॅलन आपल्या बॅगमधून हातमोजे काढीत होता तेव्हां हॅसेट त्याला म्हणाला, "When you get out there, Deafy, give the light to go" म्हणजे प्रकाशाविरुद्ध तूं तक्रार कर असा अर्थ. पुढें विकेट पडल्यावर डॉन जायला निघाला तेव्हां हॅसेट त्याला आठवण करीत म्हणाला, "Don't forget–give it a go." पण मघांशी हॅसेट जे कांहीं बोलला होता ते डॉनला ऐकूंच आले नव्हतें पण आतांचे बोल मात्र ऐकूं आलें व अर्थाचा अनर्थ केला ! क्रीजवर जाऊन आपल्या साथीदाराला त्यानें हॅसेटचा संदेश सांगितला, 'ठोका ठोकी कर' परिणाम ? तो गडी तर बाद झालाच पण टॅलनही झाला. वर 'असा मीं काय गुन्हा केला ?' चा चेहऱ्यावर भाव ठेवीत तो परतला ! तो ह्या सामन्यानंतर ऑस्ट्रेलियातर्फें पुन्हां खेळला नाहीं ! But what an exit !

ह्या नंतरच्या प्रकरणांत आधुनिक क्रिकेटबद्दल लिहितांना विलसाहेब फार गरम झाले आहेत. 'अरे, ही काय नाटकं ? फुकट पाहण्याच्या पण लायकीची नाहींत. छ्या ! तमाशे बरे. गंधर्व काय काम करीत. लाजवाब !' असं आधुनिक नाटकं पाहतांना ह्याकडे नाक मुरडीत बालगंधर्वांची नाटकें पाहिलेले लोक आपल्या गरगरीत डोक्यावर हात फिरवीत म्हणतात त्याच तोऱ्यांत आधुनिक क्रिकेटबद्दल








त्यांनीं लिहिलं आहे. तो मुद्देसूदपणें लिहितो, "इंग्लिश क्रिकेटमध्यें दुष्काळाचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. नवीन नवीन तडफदार खेळाडू बिलकुल कुठें दिसतच नाहींत. ऑस्ट्रेलियांत तर म्हणे एका रात्रींत क्रिकेट 'स्टार' जन्माला येतात तर इंग्लंड-मध्यें कसोटी सामन्याचा पल्ला गांठेतों खेळाडू पार दमून जातो." पूर्वीचे ब्रॅडमन, पॉन्स-फोर्ड, हटन, कॉम्प्टन, वीक्स वगैरे 'दमदार' सरदार गेले. "परंतु आतां मीं बघतो तो सबंध इंग्लंड संघाचा भार काऊड्री व ग्रॅव्हेनी ह्यांच्यावर पडत चालला आहे. मे निवृत्त झाल्यावर त्याच्या जागीं दोन-तीन चमकते तारे शोधून काढणें अगदीं निकडीचं होऊन बसलं आहे! कसोटी सामन्यासाठीं खेळाडू म्हणजे कसा शरीरानें धट्टाकट्टा व मनानें निगरगट्ट असा पाहिजे. नाहीतर हल्लीचें बाहुले! बघवत नाहीं त्यांच्याकडे! शिवाय हल्लीं सगळ्यांना एक फार वाईट संवय लागली आहे. जरा एखादा नवा खेळाडू चारदोन फटके मारूं लागला कीं लागले त्याला चढवायला. हा काय तर म्हणे कॉम्प्टन, हा म्हणे हटन! लोक पण असे बावळट कीं चक्क ह्या स्तुतीला उचलून धरतात हे तर सगळ्यांत वाईट आहे. परंतु सगळ्यांत धोकादायक ठरलं आहे हे कीं जेव्हां हे स्तुतिपाठ ऐकून तो तरुण खेळाडू हरभऱ्याच्या झाडावर चढतो तेव्हां तर होणारी शोचनीय स्थिति पुसूं नका! त्याला वाटतं आपण गड जिंकला पण तो भ्रमांत असतो तो गडाच्या पायथ्याशींच!!"

मग सध्यां कसोटी सामन्यासाठीं लायक तरुण खेळाडू तरी इंग्लंडमध्यें आहेत कीं नाहींत? याबाबत विवरण करतांना विल लिहितो, "मीं एका बंद कपाटासमोर उभा आहे, असं समजा. मला सांगण्यांत येतं कीं ह्या बंद कपाटांत खूप कपडे आहेत पण प्रत्यक्षांत कपाट उघडून जेव्हां मी बघतों तेव्हां एक फाटका कोट तेवढा त्यांतून बाहेर पडतो बस! त्याचप्रमाणें कसोटी सामन्यांतील खेळाडूंचं कपाट मला सध्यां रिकामं दिसतं आहे. परंतु मी आशावादी आहे. चार खेळाडूंबद्दल मला आशावाद आहे. त्यांतील एक १९ वर्षांचा पतौडीचा नबाब हा तर भारतीय आहे. उरलेले तिघे म्हणजे मिडलसेक्सचा डावखुरा पीटर पारफिट्ट, लँकेशायरचा पीटर मार्नर व जॉक फुल्लर."

ह्या चार खेळाडूंबाबत सविस्तरपणें सांगून चिमुरड्या पतौडीबाबत विल विशेषत्वानें लिहितो, "तो इंग्लंडचा रहिवाशी होवो वा न होवो परंतु त्याची क्षेत्ररक्षणाबद्दलची कीर्ति तर टिकून राहील ना? क्षेत्ररक्षणांत तो चित्ता आहे चित्ता!" फलंदाजानें चेंडू फटकावल्यानंतर झेल कोठल्या बाजूला उडूं शकेल? हे गोलंदाजानें टाकलेल्या चेंडूवरून तो ओळखूं शकतो व त्याप्रमाणें आपलं क्षेत्ररक्षण चपळाईनें बदलतो. ही प्रौढ आकलनशक्ति ह्या तरुणवयांत त्यानें कशी संपादन केली? त्याला कोणी गुरु भेटला नाहीं तर तो एकलव्य बनला! सारखा 'क्रिकेट, क्रिकेट!' हा जप तो करूं लागला. नेहमी क्रिकेटबद्दल तो विचार करी. टेस्ट खेळाडूला लागणारा हा महत्वाचा गुण त्याच्याकडे एव्हांपासूनच आहे. क्रिकेटमध्यें असामान्य यश मिळवायचं असेल तर त्या खेळाला वाहून घेतलं पाहिजे. ब्रॅडमन स्टंप घेऊन एकटाच चेंडू झोडपून काढीत असे. पण ही तपश्चर्या आतां गेली. हल्लींचे खेळाडू 'नेट' प्रॅक्टीस कशीबशी संपवून सरळ 'मेट्रो'वर पळ काढतात वा चौपाटीवर वाट असलेल्या 'ती'च्या साठीं पळतात! पुन्हां त्यांना क्रिकेटची आठवण येते ती दुसरें दिवशीं नेट प्रॅक्टीसची वेळ झाली कीं!

अनेक खेळाडूंबद्दल विलनें सडेतोड लिहिलं आहे. 'मीं काय भीतो होय कोणाला?' ह्या रोकठोक वृत्तीनें ऑस्ट्रेलियाच्या इआन जॉनसनला त्यानें सरळ 'एक टिनपाट फडतूस कप्तान' म्हणून अहेर बहाल केला आहे. तर गॉडफ्रे इव्हान्सबद्दल त्याची माया ऊतूं जाते. इंग्लंडच्या संताजी-धनाजी (लॉक, लेकर) या जोडीनें कितीक संघांना आजपर्यंत पाणी पाजल्यामुळें त्यांच्या ह्या धडाडीबद्दल त्यानें त्यांचा पाठ थोपटली आहे. 'म्हाताऱ्याच्या तोंडांत कांहीं टिकत नाहीं हेंच खरं.' ह्या वृत्तीनें जे जे त्याला कांहीं माहिती आहे ते ते सर्व सांगून तो मोकळा झाला आहे. कारण ज्या भे-प्रकरणाचा लेकरनें आपल्या Over to me ह्या पुस्तकांत स्फोट केला आहे, त्या भानगडीचे सूतोवाच एड्रिचनें ह्या पुस्तकांत करून ठेवलें आहे!

शेवटीं कसोटी सामन्यांतील दर्जा, पण कशी टिकवतां येईल? ह्या एका महत्त्वाच्या प्रश्नाची एड्रिचनें सांगोपांग चर्चा केली आहे. त्याचे ह्याबाबतीतले विचार कांहीं ठिकाणीं पटतात तर त्यानें केलेल्या कांहीं सूचना अजिबात पटत नाहींत. उलट त्याच्या आगाऊ वृत्तीची कींव येते. तो लिहितो पहा कसा, "उच्च-दर्जाचे सामने खेळण्यास सगळे देश बिलकुल लायक नाहींत. कारण इंग्लंड, ऑस्ट्रेलिया व दक्षिण आफ्रिका हे देश क्रिकेटमधलं आपलं उच्चत्व टिकवून आहेत तर न्यूझिलंड, पाकिस्तान व भारत हे असे देश आहेत कीं त्यांचा दर्जा निःसंशय दुय्यम दर्जाचा आहे. पाकिस्तान म्हणेल कीं '१९५४ सालीं ओव्हलवर आम्ही इंग्लंडचा पराभव केला कीं!' परंतु पाकिस्तानच्या विजयांत दैवाचा भाग जास्त आहे. कधींहि न मिळणारे वातावरण त्यांना अनुकूल झालें व ते जिंकले. अशा तऱ्हेचा विजय ते सतत दहा वर्षें इंग्लंडशी खेळले तरी त्यांना मिळणार नाहीं! ह्याकरितां न्यूझिलंड, पाकिस्तान व भारत ह्यांना दुय्यम दर्जाचे कसोटी सामने खेळावयास बोलवावें. ह्यामुळें हल्लीं होणारी कत्तल थांबून, प्रेक्षकांना चांगले सामने बघायला मिळतील व आम्हांला आणि त्यांनाहि तरुण खेळाडूंची चांगली जोपासना करतां येईल." पण विलसाहेब, मला एक सांगा, उच्च दर्जाचे व दुय्यम दर्जाचे कसोटी सामने ह्यांतील सीमारेषा कोणती? उच्च दर्जाचे कसोटी सामनेहि रद्द करून कशावरून खेळले जाणार नाहींत? नांवाच्या बडेजावावरून जाऊं नका तुम्ही!

अशा तऱ्हेनें मतप्रदर्शित करून स्वतःच्या वरील सूचनेबाबत तो स्वतःच शंकित आहे. ही सूचना अंमलांत येईल कां? परंतु विलचं एक मत स्पष्ट आहे कीं ह्यापुढें इंग्लंडनें वाटेल त्या देशाविरुद्ध खेळतांनाहि चांगला मजबूत संघ निवडला पाहिजे व कमींत कमी वेळांत ह्या संघांचा धुव्वा उडविला पाहिजे! बाकी एकमात्र खरं हं विलसाहेब, कां हल्ली 'टेस्ट कॅप' मिळविणं फार सोपं झालं आहे. जी टोपी मिळविण्याकरितां पूर्वी तपश्चर्या करावी लागे ती हल्लीं लॉटरीच्या बक्षिसांप्रमाणें वाटली जाते! कोणीही चौकोन भरावेत, अगदीं झाडूवाल्यानेंसुद्धां, दुसरे दिवशीं मनीऑर्डर घेऊन सलाम ठोकीत पोस्टमन हजर!

अनुक्रमणिका











❀ फर्मास ' कथा—

— पुष्पा त्रिलोकेकर

❀ गप्पा गोष्टी—

— जयवन्त

फर्मास ' कथा—

## अहिल्या

' दीपावली ' वार्षिकाच्या धुंदफुंद सप्तरंगी दिमाखांत आपल्या साहित्याची उल्लेखनीय मर टीकणाऱ्या ' ळज्जतदार ' लेखकांपैकी स. आ. जोगळेकर हे एक. या वार्षिकांतून प्रसिद्ध झालेल्या चार कथांना दुसऱ्या एका कथेची जोड देऊन ' अहिल्या ' संग्रहरूपानें आली आहे.

स्त्री हा या पांचपैकीं चार कथांचा मुख्य वर्ण्य विषय, अनाद्यंत तरीहि अवीट ! नि तो.हि अनैतिक संबंधावर आधारलेला ! पण तरीहि ' कामकथा ' हें सवंग विशेषण त्यांच्या बाबत गैरलागू ठरावं. याला कारण त्यांना मिळालेली श्री. जोगळेकरांच्या रसिल्या, रंगेल व्यक्तिमत्वाची डुब ! एखाद्या रंगीत सायंकाळीं संथपणें, जराशा अलिप्त ( नि म्हणूनच चोखंदळ ) वृत्तीनें कडक मद्याचे घुटके घ्यावेत, हलकेहलके थांबत त्याची पुरती लज्जत चाखावी तशा जोगळेकरांनीं या कथा ( व त्यांचा विषयहि ! ) हाताळल्या आहेत. नि त्यांना साथीला आहे खास मर्दानी भाषा ! लालित्य, लास्य, लवचिकपणा हे सारे भाषाविशेष स्त्रैण वाटावेत इतका तिचा थाट अस्सल मर्दानी आहे. नि म्हणूनच हा 'पाऱ्यासारखा चंचल ' विषय तिला नि केवळ तिलाच पेलतो ' मनोविश्लेषणात्मक ' ' सूक्ष्मातिसूक्ष्म पापुद्रे उलगडणाऱ्या ' आदि लेबलें चिकटवलेल्या बऱ्याचश्या ' नवकथां '-तून ओघळणाऱ्या ओंगळ वासनांचा तिला संपर्क होत नाहीं; विकृत व विद्रूप वखवख तिला स्पर्शत नाहीं.

खरं पाहिलं तर या कथा केवळ स्त्री-भोंवती, नि तें सुद्धां तिच्या बाह्यांगाभोंवती फिरतात. त्या स्त्रियासुद्धां कशा ! पुरत्या विकसित. ' सुगंधाची कळ न साहवणाऱ्या ' प्रौढ सुरंगीसारख्या.

जोगळेकरांनीं केलेलें अशाच एका प्रौढेचें हें वर्णन : "...काळानें किंवा काळजीनें तिच्या कपाळावर किंवा कपोलावर अद्याप ओरखडे ओढले नव्हते. एकादी सुरकुती असलीच तर ती जातिवंत व परिपक्व हपूसच्या केशरी व गुटगुटीत शरीरावर असते तशी; माधुर्य व स्वाद यांच्या परिसीमेची द्योतक ! ''

' अहिल्ये 'तील सकच्छ स्त्रीच्या पृष्ठदर्शनाचें वर्णन तर केवळ अप्रतिम आहे ( खरा शब्द वापरायचा होता ' फर्मास ' ) एखाद्या सुसज्जित रंगमहालांत नितळ आवाजाच्या गायिकेनें ठुमरी लावावी नि त्या नक्षीदार कोरीव स्वरांच्या कीनखाबी तुकड्यांनीं तिथला प्रसन्न परिसर उन्मादकतेनें शिगोशिग भरावा, निथळून यावा नि मग त्यांचीच धुंदी मनावर राहावी तशी जोगळेकरांची कथा साकारते.

या पहिल्या चार कथांची कथावस्तू जवळजवळ सारखीच आहे. ठरीव, सुखवस्तु नि म्हणून अळणी अशा पांढरपेशा चाकोरींतून कधींमधीं बाहेर पडूं पाहणाऱ्या ( हें अर्थात् शहाजोग संभावितपणाचा बुरखा फाटूं न देतां ) रंगेल नि रंगेल्या ' मी ' ला भेटलेल्या अनामिका ! कधीं गरजू पण बऱ्याचदां त्याच्यासारख्याच अगतिक, प्रतिष्ठितपणाच्याच मर्यादा पाळूं इच्छिणाऱ्या ! दोघांतं नातं जोडते ती एक विशिष्ट भूक. अभक्ष्याची म्हणून तिची रुचि अर्थातच अधिक. तिथं नांवगांव, जातपात अडत नाहीं. कधीं ती रस्त्यांत आढळणारी बहुजनसमाजांतील स्त्री असते, कधीं फलाटावरील मध्यमवर्गीय. रेसकोर्सच्या प्रांगणांतील उच्चवर्णीयांची तर गोष्टच नको. एकच नातं ! ती स्त्री हा पुरुष !

' वारीयानं कुंडल हाले ' हें एका तमाशाच्या बारीचं वर्णन. लावणीसारखीच खुमासदार असलेली ही कथा "कमळे ' च्या तोंडची एकनाथांची गवळण मूर्तिमंत साकारते. तिचे सूर कानांच्या पडद्यांना जणु स्पर्शून जातात. नि जोगळेकरांच्या लेखणीच्या प्रत्ययकारी सामर्थ्याची प्रचीति पटते.

' अखेरची मुद्रा ' ही एकच गोष्ट या संग्रहांत सर्वस्वी निराळी नि तितकीच वाचनीय. जुन्या मुद्रांच्या, मूर्तींच्या शोधांत लेखकाला आलेला हा एक विलक्षण करुण अनुभव. जुन्या मुद्रांची खोटी टांकसाळ करून ' काळा ' पैसा मिळवूं पाहणाऱ्या पितापुत्रांची ही शोककारी हकीकत. जोगळेकरांनी तीहि आपल्या खास शैलीनं रंगवली आहे.

• • •

असा हा पांच कथांचा एक संग्राह्य संग्रह. रसिक, चोखंदळ पण अलिप्त वृत्तीनं लिहिलेला. एकादी अश्लिल, उन्मादक, क्वचित् उत्तान भावाची लावणी एकाद्या मोहोरेदार गोळीबंद आवाजाच्या स्त्रीनें गावी, तिचे शब्द मागें सारून सुरांनींच साऱ्या वातावरणाचा कब्जा घ्यावा, तेच तेवढे मागें राहावे तशी जोगळेकरांची कथा वाचकाच्या मनावर आपली मुद्रा उठवते; त्यांची कथा नि त्यांची ' स्त्री ! '

— पुष्पा त्रिलोकेकर

• • •

गप्पागोष्टी—

## साखरेचीं चित्रें

[ लेखक : श्री. रमेश मंत्री; पृष्ठें १४०; किं. रु. ३, प्रकाशक : मनोहर ग्रंथमाला, सदाशिव पेठ, पुणें २.]

नव्यानें पुढें येणारे विनोदी लेखक श्री. रमेश मंत्री यांच्या एकूण चौदा विनोदी लेखांचा हा संग्रह पुण्याच्या मनोहर ग्रंथमालेनें प्रसिद्ध केला आहे.

अलिकडे विनोदी लेख, विनोदी कथा यांना अधिक प्रमाणांत मागणी येऊं लागली








आहे. बहुतेक मासिकें चाळून पाहिलीं तर त्यांतून प्रयत्नपूर्वक विनोदी कथा अगर लेख यांना स्थान दिल्याचें आढळून येतें. कांहीं मासिकें तर मुखपृष्ठावर एखादें 'विनोदी' चित्र टाकून 'विनोद विशेषांक' काढीत असतात. त्यांत विनोद हमखास असतोच असें नाहीं. अनेकदां तसले प्रयत्नच विनोदी ठरतात. परंतु या सान्या विनोदांतून एक गंभीर निष्कर्ष प्रत्ययास येतो, आणि तो म्हणजे सध्यां विनोदाला बाजारभाव आहे.

पण लेखनाचें प्रमाण दुर्दैवानें व्यस्त आहे. मासिकें भरपूर आहेत. त्यांच्याकडून येणारी विनोदी साहित्यासाठीं मागणीहि भरपूर आहे. पण विनोदी लिहिणारे लेखक मात्र इतके कमी आहेत कीं एका हाताचीं बोटेंसुद्धां पुरीं पडावींत. त्यांतहि पुनः पायऱ्यांतील अंतर व्यस्त आहे. श्री. पु. ल. देशपांडे ज्या पायरीवर उभे आहेत त्याच्या जवळपासच्या पायरीवर दुसरा विनोदी लेखकच नाहीं. आणि खालच्या अंतरावरील दोनचार पायऱ्यांवर बाकीचे दोन चार लेखक उभे आहेत. त्यामुळें त्यानाहि बराच बाजारभाव आहे.

याच दोघाचौघांत श्री. रमेश मंत्री उभे आहेत. पण इतरांपासून आपला माल वेगळा दिसावा म्हणून त्यांनीं आपल्या विनोदाचा वेगळा प्रकार ठरवून टाकला आहे असें दिसतें. या संग्रहांतला कोणताहि लेख वाचून पाहिला तरी या गोष्टीचा अनुभव येतो.

श्री. मंत्री यांच्या विनोदाचीं वैशिष्ट्यें सांगावयाची झालीं तर असें म्हणतां येईल; त्यांना विनोदी कथेचें वावडे आहे. विनोदी व्यक्ति आणि तिच्या भोंवतीं गुंफलेलें विनोदी कथानक यांची त्यांना फारशी कदर नाहीं. त्यामुळें या संग्रहांतल्या चौदाहि कथांत ('टार्झन पुण्यांत येतो' हा अपवाद सोडल्यास) ठळकपणें नजरेंत भरणारें व्यक्तिचित्र नाहीं, किंवा कथानक नाहीं. त्यामुळेंच अनाहूतपणें जो रोष आला आहे तो भाषेचा ! डौलदार आणि सूक्ष्म विनोद निर्माण करणारी भाषा वापरण्याच्या फंदांतच ते कधीं पडत नाहींत त्यामुळेंच 'प्रत्येक तत्त्वज्ञान परिषदेला आतांपर्यन्त अगदीं नियमितपणें हजर राहून तत्त्वज्ञानाची प्रगति करण्यासाठीं तीन ते एक कागद (पेपर) वाचीत असत.' (प्रा. दिव्यांची फायदेशीर दुर्दशा !) असला विनोद करण्याचा मोह त्यांना होतो.

समाजांत निरनिराळ्या अंगांनीं दिसणारा विनोद कल्पनाशक्तीनें एकवटून तो व्यक्तिचित्रांत अथवा कथानकांत बेमालूमपणें वापरण्याची हातोटी त्यांनीं कमावलेली नाहीं. पण (कदाचित असलें एक वैशिष्ट्य म्हणून असेल) त्यांनीं सामाजिक घडामोडींची टिंगल करण्यावर आपली शक्ति केंद्रित केली आहे. आणि त्यांत ते भरपूर प्रमाणांत यशस्वी झाले आहेत यांत मुळींच शंका नाहीं.

या संग्रहांतले चौदा लेख वाचतांना असें वाटतें कीं एखादा विनोदी स्वभावाचा गप्पिष्ट माणूस बैठकीमध्यें आपल्या अनुभवाच्या चार गंमती सांगतो आहे, करमणूक करतो आहे, लोकांची टिंगल करतो आहे, टोप्या उडवतो आहे. कांहीं लेखांची शीर्षकें नजरेखालून घातलीं तरी ही गोष्ट लक्षांत येते. "माझा दाल—चीनचा प्रवास," "आमच्या गांवची निवडणूक," "आमच्या गांवचें संमेलन," ही शीर्षकें पाहिलीं तरी लक्षांत येतें कीं प्रचलित सामाजिक व्यवहारांची ही टिंगल आहे. आणि ती खरोखरच खोंचक आणि बोंचक आहे.

चीनचा प्रवास करून आल्यानंतर हुरळून गेलेल्या अनेक (सह) प्रवाश्यांनीं चीनच्या कम्युनिस्ट सरकारनें एका वर्षांत किती डांस मारले याची आंकडेवारी दिली होती. अशा प्रवाश्यांची चोख टिंगल 'माझा दालचीनचा प्रवास' या लेखांत यशस्वीपणें केलेली दिसते.

सामाजिक उद्धारासाठीं नटवेपणानें बाहेर पडलेल्या श्रीमंत महिला काय करतात आणि काय करून बसतात याचें विनोदी चित्रण 'रामा–शिवा–गोविंदा' या लेखांत हंसत खेळत केलेलें दिसतें. "टेलिफोन पहावा करून' या लेखांतहि टेलिफोनमुळें काय साधतें आणि काय ओढवतें याचें खुमासदार दर्शन घडवलें आहे.

अशा चौदा लेखांत समाजाच्या भंपकगिरीवर चांगले कोरडे ओढण्यांत आणि तसे कोरडे ओढून वाचकांची करमणूक करण्यांत श्री. मंत्री यानीं चांगलेंच यश मिळविलें आहे. मनाचा शीण घालवण्यासाठीं किंवा दैनंदिन दगदगीचा कडवटपणा कमी करण्यासाठीं ही 'साखरेचीं चित्रें' वाचकांना आवडतील अशी आशा व्यक्त करण्यास हरकत नाहीं.

अशा पुस्तकाला विनोदीपणें मुखपृष्ठाची जोड असती तर अधिक बरें झालें असतें. आहे तें चित्र वाईट आहे असें नाहीं. तें चित्र म्हणून चांगलें आहे. पण कोणत्याहि गंभीर विषयावरील पुस्तकालाहि तें चालूं शकलें असतें. 'साखरेचीं चित्रें' हें नांव या चित्रांत सार्थ झालें असलें तरी तें विनोदी नाहीं, कदाचित चित्रकाराला मूळ लेख वाचायला मिळाले नसावेत.

पुस्तकाची छपाई बऱ्याच प्रमाणांत चांगली आहे. किमान विनोद करणाऱ्या चुका तरी नाहींत. तेंहि कांहीं कमी नाहीं !

—जयवन्त

---

(पान ५८ वरून चालू)

देवनागरी टाइपांचें आद्य संशोधक श्री. जावजी दादाजी यांची ओळख फारच हृद्य वाटली. त्यांनाच हें प्रकाशन अर्पिलें आहे.

वरील मजकुरावरून नाटक पाहायला यावें त्याप्रमाणें कांहीं तास हे छापखानदार एकत्र आले असावेत असा समज होईल. पण तो चूक ठरेल. महाराष्ट्रांतील लहानमोठ्या गांवांतून आलेले जवळजवळ साडेतीनशे ते चारशे मुद्रकबंधू तब्बल दोन दिवस बालमोहन विद्यामंदिराच्या प्रशस्त परिसरांत मुक्काम ठेवून होते. विद्यामंदिराच्या जागेंतच मुद्रण साहित्याच्या वितरकांनीं आणि कारखानदारांनीं आपले स्टॉल्स उघडले होते. माझ्या माहितीप्रमाणें या मंडळींनी दोन दिवसांत हजारों रुपयांची विक्री केली आणि पुढील सहा महिन्याच्या व्यवसायाचीहि तरतूद केली. महत्त्वाचा भाग म्हणजे पाहुणेमंडळीची भोजनव्यवस्था संपूर्णपणें निर्दोष आणि नाविन्यपूर्ण होती. केवळ दीड तासाच्या अवधींत जवळजवळ सहशें मंडळींचें भोजन मिलिटरीतल्याप्रमाणें उरकलें जाई आणि तेंहि कोणाची कसलीहि गैरसोय न होतां.

मुद्रकांच्या या अधिवेशनाचा एकंदर झोकनोक, शान आणि दुथडी भरून चाललेला उत्साह पाहिल्यानंतर मुंबईतील अनेक मुद्रकांनीं आपल्या मोहकांच्या छापकामांची बरीच खोटी केली असावी असा कयास बांधण्यास हरकत नाहीं.

— मुद्राधारक









## साहित्य

• रवीन्द्रनाथ टागोर • ना. धों. ताम्हनकर • सरकारी 'सुवेठ' नाट्यप्रयोग • भावनगर कॉंग्रेस • महाराष्ट्राची जमीन सुधारणा • महाराष्ट्रीय मुद्रकांचा मुंबईतील मेळावा.

### रवीन्द्रनाथ टागोर

गेल्या महिन्यांत भारतांत सर्वत्र गीतांजलिकार रवींद्रनाथ टागोर यांची शतसंवत्सरी मोठ्या उत्साहानें साजरी झाली. रवींद्रनाथ आणि मोतिलाल नेहरू यांचा जन्म एकाच तारखेस एकाच महिन्यांत आणि एकाच वर्षी झाला हा योगायोग असला तरी स्वतः नेहरूंनीं कबूल केल्याप्रमाणें त्यांच्या जीवनावर टागोर आणि मोतीलाल यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि विचारसरणीचा फार मोठा परिणाम झाला आहे. आणि त्यामुळें टागोर उत्सवाला सरकारी प्रतिष्ठा आणि पाठिंबा मिळवून देऊन पं. नेहरूंनीं रवींद्रनाथांचें ऋण एकापरीनें फेडलें आहे. या संदर्भांत मुंबई शहरांत झालेल्या टागोर उत्सवाकडे पाहिलें असतां निराशा पदरीं येते. यांतील कांहीं कार्यक्रम अत्यंत रेखीव आणि वेधक झाले तरी हे सर्व कार्यक्रम समाजांतील वरच्या थरापुरतेच मर्यादित होते कीं काय नकळे. रवींद्रनाथांचें वाङ्मय आणि तत्त्वज्ञान यांचा प्रचार सर्व थरांतून निर्माण होण्याच्या दृष्टीनें मुंबईतील उत्सव अपेशी ठरला. सरकारनें याबाबत अधिक जागरुकता आणि व्यापकता दाखविली असती तर टागोरांबद्दलचा उत्साह सर्वसामान्यांतहि निर्माण झाला असता, नाहीं असें नाहीं. पण एकंदरीत मराठी मनाला टागोरांचें आकर्षण कधीं वाटलेंच नाहीं. श्रद्धेवर आधारलेल्या प्रचारयत्नां आणि नसत्या गूढत्वाला महाराष्ट्रानें कधींच प्रोत्साहन दिलें नाहीं आणि त्यामुळें रवींद्रनाथांभोंवतीं त्यांच्या पूजकांनीं जें वलय निर्माण केलें त्याचें महाराष्ट्रानें कधींच कौतुक केलें नाहीं. उलट बंगालीतील शरद्बाबूंसारख्या लेखकाबद्दल मराठी माणसाला जो जिव्हाळा आणि आत्मीयता वाटली तेवढी रवींद्रवाङ्मयाबद्दल कधींच वाटली नाहीं. त्यामुळें सरकारी प्रोत्साहनानें सुरूं झालेला हा टागोर उत्सव सामान्यांच्या पचनीं पडला नाहीं असें खेदानें कबूल केलें पाहिजे.

### ना. धों. ताम्हनकर

सुप्रसिद्ध लेखक श्री. ना. धों. ताम्हनकर यांचें गेल्या महिन्यांत झालेलें आकस्मिक निधन ही वाङ्मयप्रांतातील एक शोचनीय घटना. किर्लोस्कर मासिकाचे सहसंपादक या नात्यापेक्षां किर्लोस्कर मासिकाचे लेखक या नात्यानेंच ते महाराष्ट्रांत परिचित होते. त्यांच्या 'दाजी' या व्यक्तिचित्रानें एकेकाळीं महाराष्ट्रीय वाचकांना वेड लावलें होतें. दाजीच्या मिस्किल आणि उपरोधपूर्ण साहसांनीं खमंग आणि चुरचुरीत झालेल्या कथा वाचण्यासाठीं एक काळ मराठी वाचक किर्लोस्करच्या अंकाची वाट पहात असे हें सत्य आहे. आज दाजी दृष्टिआड झाला आहे कारण समाजजीवनांत इतका झपाट्यानें बदल झाला आहे कीं आतां एका नव्या दाजीची आवश्यकता आहे. आणि ताम्हनकरांनींच त्यानंतर निर्माण केलेला तात्या मराठी वाचकांना मुळींच आकृष्ट करूं शकला नाहीं. ताम्हनकर चांगले नटकार होते. अर्थात् त्यांच्या प्रतिभेची झेप तोकडीच पण त्यांनीं लिहिलेलें 'उपना नवरा' हें नाटक महाराष्ट्रांतील भगिनी समाज, हौशी नाट्यसंस्था यांना बरेंच दिवस पुरलें. मासिकाच्या संपादकीय खात्यांत असल्यामुळें ताम्हनकरांनीं विपुल आणि विविध विषयांवर लिहिलें आहे. बालवाङ्मयांतहि त्यांचें स्थान त्यांचा 'गोट्या' बरेच दिवस टिकवून धरील. साधेभोळें श्रद्धेवर आधारलेले पण पुरोगामी असें समाजजीवन ताम्हनकरांनीं चितारलें आणि ओघवत्या लेखनशैलीमुळें ते लोकप्रियहि झाले. त्यामुळें ताम्हनकरांच्या मृत्यूमुळें मराठी वाङ्मयाचें नुकसान झालें आहे हें निर्विवाद.

— पिनाकि

### सरकारी 'सुवेठ' नाट्यप्रयोग

महाराष्ट्र सरकारनें यंदा उत्सवी प्रमाणांत जाहीर केलेला नाट्यस्पर्धेचा कार्यक्रम संपल्यानंतर आदर्श मराठी रंगभूमीचें यथार्थ दर्शन व्हावें म्हणून नियोजित केलेल्या सुविहित (!) नाटकाचे कार्यक्रम मुंबईच्या रंगभवनांत रसिक व नाट्यप्रेमी श्रोतृवृंदांच्या भरगच्च उपस्थितींत करून दाखवण्याचा स्तुत्य उपक्रम योजिला होता. सुविहित हा शब्द वापरून कांहींतरी विशेष करून दाखवण्याचा सरकारी मानस फक्त कागदोपत्रींच यशस्वी झाला असें ह्या प्रयोगांचें दर्शन घडणाऱ्या प्रेक्षकांना वाटलें. ह्याचें कारण प्रस्तुत सरकारी योजनेचा भोंगळपणा व हे कार्यक्रम हाताळणाऱ्या अधिकाऱ्यांचा नवशिकेपणा असें मानलें तर तें गैर ठरणार नाहीं. प्रत्येक नाट्यसंस्थेला प्रयोगानिमित्त दोन हजार रुपये व दिग्दर्शकाला पांचशे रुपये अशी यथार्थ किंबहुना अतिरिक्त मानधनाची योजना आंखून नाटकलेला सरकारचा उदार आश्रय

देण्याची कल्पना जरि तत्वतः सुयोग्य होती तरिसुद्धां नाट्यसंस्थांची व नाटकांची निवड घिसाडघाईनें करण्यांत आल्यामुळें मराठी नाट्यकलेचे अतिरथी, महारथी व त्यांचें सुविहित नाट्यकौशल्य न दिसतां बाजार बुणग्यांची पलटण नाट्यकलेशीं नकली लक्ष्मीधराच्या वैभवानें आणि शौर्यानें दोन हात करतांना पाहून ख्यातनाम मराठी नाट्यकलेचें जणुं पानिपतच रंगभवनांत साजरें झालें असें रसिक जनतेला वाटलें. ज्यांनीं एकेकाळीं मराठी रंगभूमि गाजवली असे अनेक नट अजूनही हयात व कार्यक्षम आहेत. ह्या नटनस्यांची एकेकाळीं गाजलेली कारकीर्द ध्यानांत घेऊन त्यांना व तसेंच सरकारी वर्षासन मिळालेले व मिळत असलेले नाट्यतपस्वी ह्यांना ह्या उपक्रमांत सहभागी करून संमिश्र स्वरूपाचे नाट्यप्रयोग अगर एखाद्या दिवशीं ह्यांचे निरनिराळे नाट्यप्रवेश सादर केले असते तर चालू पिढीच्या ह्या कलावंतांच्या कलेची प्रचीति येऊन कलावंतांचाही गौरव झाला असता. प्रस्तुत उपक्रमांत रंगभूमीवर सध्यां न दिसणारे फक्त केशवराव दाते हे एकच नाट्यतपस्वी आपलें विख्यात नाट्यदर्शन प्रगट करते झाले आणि त्यांनीं रसिकजनांच्या श्रवण-नेत्रांचे पारणे फेडलें. ह्या सुविहित आयोजनांत साहित्यसंघाच्या पदरीं दोन नाटकें पडली व नाट्यनिकेतनसारखी संस्था उपेक्षिली गेली हें जसें विचित्र वाटलें तसेंच निवडलेल्या संस्थांच्या नाट्यप्रयोगाची चांचणी व चौकशी नीट न झाल्यामुळें फक्त साहित्यसंघाचा 'सवाई माधवरावाचा मृत्यु' हा एकच सुविहित कार्यक्रम दिसला. बाकीचे नाट्यप्रयोग चावून चोथा झाल्यासारखे चरचट व जुनाटच कां आयोजिले गेले हें सांगणें कठीण आहे. ह्या उपक्रमाचें उद्घाटन मराठी रंगभूमीचे ललामभूत नट बालगंधर्व ह्यांच्या हस्तें झालें हें सुयोग्यच; पण त्या दिवशीं त्यांना जें सौभद्राचें दर्शन घडलें त्यानें 'हें फल काय मम तपाला' असें वाटून ते विषण्ण झाल्याचे दिसलें. गेलीं पंचाहत्तर वर्षे मराठी रंगभूमीवर अढळपद प्राप्त झालेलें हें नाटक 'मराठी रंगभूमी' ह्या संस्थेनें सादर करून आजच्या रंगभूमीचा कोतेपणा व दारिद्र्य यांचे सुविहित दर्शन रसिकांना मात्र घडवलें. दिग्दर्शकाचा मलिदा आणि जमल्यास विरुद्ध पक्करण्यास सिद्ध झालेले नाट्याचार्य गणपतराव बोडस ह्यांनीं प्रस्तुत नाटकाचें दिग्दर्शन केल्याचें जाहीर झालें होतें. पण नाटकाचे तीनतेरा झाल्याचे दिसतांच त्यांनीं यज्ञोपवीत झटकून आपल्या बेजबाबदारीचें नाटक मात्र प्रगट केलें. वृत्तपत्रांतल्या टीकेला उत्तर म्हणून त्यांनीं जें प्रसिद्धिपत्रक काढलें आहे त्यावरून त्यांना सरकारनें फुकट फौजदारीचे पांचशें रुपये देणें कितपत यथार्थ आहे हाहि एक प्रश्न आहे. तसेंच त्यांचा स्पष्टवक्तेपणा ह्याबाबतींत मात्र कां निरपेक्ष राहिला नाहीं याचेंही आश्चर्य वाटलें. पात्रयोजना, संगीत व नेपथ्य ह्या नाट्यदर्शनाच्या तीनहि प्रमुख अंगांत पूर्णपणें अयशस्वी ठरलेलें हें नाटक जर पुन्हां प्रदर्शित करण्यांत आलें तर त्याला प्रेक्षकांची उपस्थिति कितपत लाभेल ही शंकाच आहे.

हा मुहूर्ताचा नारळ पोला ठरल्यामुळें पुढील कार्यक्रमांचे काय होतें ह्या आशंकेनें तिकिटवाले प्रेक्षक हवालदिल झाले असल्यास आश्चर्य नाहीं. पण दुसऱ्या दिवशीं नानासाहेब फाटकांनीं आपला हातखंडा प्रयोग 'हॅम्लेट' नेहमींपेक्षां विशेष संयम दाखवून जिद्दीनें केला व आपल्या नाट्यकौशल्याची परिसीमा दाखवून तब्बल साडेतीन तास प्रेक्षकांना मंत्रमुग्ध करून सोडलें. तिसरा प्रयोग साहित्य संघाचा 'सवाई माधवरावाचा मृत्यु' हा मात्र सर्वतया सुविहित झाला असें म्हणावें लागेल. नटवर्य केशवराव दात्यांच्या एरवीं विकल वाटणाऱ्या शरिरयष्टींतून त्यांनीं आपल्या तेजस्वी नाट्यगुणाचें दिग्दर्शनाचें व नेपथ्यरचनेचें जें दर्शन घडवलें त्यांनीं प्रेक्षकांचे डोळे दिपले आणि तृप्त झाले. रंगमंच, नेपथ्य व वेषभूषा ह्यां बाबतींत सढळ हातानें खर्च करून सरकारी मानधनाची यथायोग्य विल्हेवाट फक्त ह्याच प्रयोगांत दिसली. केशवराव दाते, दत्taराम, विजया खोटे ह्यांनीं आपापल्या भूमिका आपलें नाट्यकौशल्य पणाला लावून रंगवल्यामुळें पाठांतराच्या अभावाचा क्वचित् विरस क्षम्य ठरला. चौथा प्रयोग एकेकाळीं नाट्यमन्वंतर केलेल्या 'आंधळ्याच्या शाळे'चा झाला. मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयानें सादर केलेला हा प्रयोग एकेकाळीं गाजलेल्या या नाटकाचें जणूं विडंबन ठरावें इतका विस्कळित व अपरिणामकारक झाला. ह्या नाटकाची पात्रयोजना जितकी अयथार्थ होती तितकेंच त्याचें दिग्दर्शनही भोंगळ होतें. दिग्दर्शक श्री. के. नारायण काळ्यांना एकेकाळीं दात्यांनीं दिलेल्या धड्यांचा पूर्ण विसर वयोमानामुळें पडला होता कीं काय असें वाटत होतें. तशांत विश्वनाथाच्या भूमिकेंतला दत्तारामांचा दिल-ए-जलाली मेकअप, त्यांचप्रमाणें श्री. मास्टर पेंडश्यांचा कोल्हापुरी मेंढ्याचा थाट व 'विंग्रजी' उच्चार, अनुशिक्षित वाटणारी नुशीला, थिल्लर वाटणारी बिम्बा आणि पुणेरी हिरो दिसणारे कुमार ह्यांनीं आपापल्या परीनें नाटकाच्या नीरसतेला हातभार लावला. एकेकाळीं ज्योत्स्नाबाईनीं रंगवलेली भावगीतें नेल्याच्या आवेशांत लीला नेहतांनीं आळवून संगीतालाहि सपाट केलें.

साहित्यसंघाचें चालू नाटक 'सुंदर मी होणार' हें प्रस्तुत उपक्रमांतलें पांचवें नाटक. संघाचा हा हातखंडा प्रयोग ह्यावेळीं मात्र सामान्य वाटला, ह्याचें कारण कदाचित् बदललेल्या पात्रयोजनेकडे जाईल. विजया जयवंतनीं सफाईदार केलेली दीदीराजेची भूमिका प्रयत्न करूनही मंगला संझगिरींना पेलली नाहीं व ह्या भूमिकेशीं संबंधित असलेली महाराजांची भूमिका दाजी भाटवडेकरांनीं अंगांत संचार झाल्यासारखी तऱ्हेवाईकपणें व समोरच्या सरकारी फिल्मी कॅमेऱ्याकडे लक्ष ठेवून तसेंच आपल्या वैशिष्ट्यपूर्ण इंग्रजी शब्दोच्चारांनीं बिघडवून टाकल्यामुळें प्रयोगांतल्या इतर यशस्वी भूमिकांची एकसंधता नष्ट झाली. सौ. सुमन ताटे ह्यांची बेबी राजेची, तसेंच ललिता केंकरे व चंद्रचूड वासुदेव ह्यांच्या अनुक्रमें मेनका व सुरेश ह्या भूमिका मात्र स्वतंत्रपणेंही चांगल्या रंगल्या.

ललितकलादर्शच्या द्विशतक पूर्ण केलेल्या यशस्वी 'दुरितांचे तिमिर जावो' ह्या नाट्यप्रयोगानें प्रस्तुत उपक्रमाचें भरतवाक्य म्हटलें. हा प्रयोग संस्थेनें नेहमींप्रमाणेंच यशस्वितेनें करून दाखविला आणि त्याचें सर्वस्वी श्रेय आजच्या मराठी रंगभूमीचे एकनिष्ठ कलोपासक श्री. भालचंद्र पेंढारकर यांच्या मेहनतीकडें जातें. एकंदरीत उपक्रमाच्या सुरवातीच्या प्रयोगाची भूमिका समजावून देण्याच्या प्रयत्नांत श्री. नानाराव

तुमण्यांनी म्हटल्याप्रमाणें हीं सहा 'सोव्हिएट' नाटकें अखेरच्या पडदा पडल्यानंतर सुनेंठच वाटलीं. ह्या यंदाच्या अपयशावरून पुढील वर्षी तरी ही योजना सुसंबद्ध ठरावी अशी अपेक्षा आहे.

—सारस्वत



### भावनगर काँग्रेस

डिसेंबर महिन्याच्या अखेरीला गुजरात-मध्यें अखिल भारतीय काँग्रेस अधिवेशन मोठ्या थाटामाटांत पार पडलें. अधिवेशनां-तील अनावश्यक दिमाख आणि खर्च टाळण्याकरितां अध्यक्षांची बैलाच्या रथांतून मिरवणूक न काढतां एका मोटारींतूनच काढली हा या अधिवेशनांतील एक नवा बदल. या पलीकडे काँग्रेसची शक्ति वाढेल आणि देशांतील सर्वसामान्य जनतेचा गेलेला विश्वास परत मिळवितां येईल असें कोणतेंच उद्दिष्ट या अधिवेशनानें साधलें नाहीं. आतापर्यंत इतर अधिवेशनांत ज्या घोषणांचा काँग्रेसनें उच्चार केला त्याच घोषणा पुनरपि नव्या शब्दांत मांडण्यांत आल्या. ( त्यांत दारूबंदीवरील विश्वास टांसून प्रकट केला गेला ). परराष्ट्रीय धोरणाबाबतचा ठराव असाच शब्दजंजाळांनीं भरलेला आणि अस्सल नेहरूभाषेंत होता. काँग्रेसचे ठराव तयार करण्यांत पं. नेहरूंचा लेखनिक हात असतो. हें या अधिवेशनांत–' मी काँग्रेसचा कारकून आहे ' या शब्दांत नेहरूंनीं जाहीर केलें. त्यामुळें सर्व अधिवेशनावर पं. नेहरूंच्या व्यक्तिमत्वाची गडद छाया पडली होती. याचें लहानसें पण उद्बोधक उदाहरण म्हणजे काँग्रेस कार्यकारिणींत इंदिरा गांधी यांना निवडणुकींत सर्वात जास्त मतें मिळाली. या मतांच्या उच्चांकाच्या मागें इन्दिरा गांधींच्या व्यक्तिमत्वाच्या प्रभावापेक्षां काँग्रेसमधील थोरामोठ्यांची पं. नेहरूंना खूष करण्यासाठीं

( पान ४५ वरून )

गवसण्याच्या आनंदाला मी मुकलों असतों. ज्याची कोणतीही गोष्ट हरवत नाहीं, त्याला ती अचानक सांपडल्याच्या आनंदाला मुकावें लागतें. ''

माझ्या मित्राचें हें समर्थन मला पूर्णपणें पटलें होतें. वेळच्या वेळीं वेळापत्रकाप्रमाणें आणि घड्याळाला साक्षी ठेवून काम करणारा मनुष्य यांत्रिक मनोवृत्तीचा बनतो. चुकामुकीच्या उत्कंठेचा, दारुण निराशेचा व अनपेक्षित भेटीचा आनंद शिस्तप्रिय माणसाला कधींच लाभत नाहीं. जीवनाची गाडी टाईमटेबलप्रमाणें हांकणारे हे लोक सिग्नल, घंटा व घड्याळ ह्यांची क्षणोक्षणीं खंत करीत राहतात. व त्यामुळें त्यांना प्रवासाचें सुख मिळत नाहीं. या उलट काळाच्या अथांग अवकाशांत स्वैरपणें जीवनाचें तारूं हांकणारे नाविक संथपणानें आणि सुखांत प्रवास करीत असतात.

परमेश्वराला देखील समाजवादाचें तत्त्व पटलेलें आहे हें सिद्ध करण्यासाठीं एका सभेंत एका पुढाऱ्यानें वेळाच्या वाटणीचें उदाहरण दिलेलें होतें. दिवसाच्या चोवीस तासांचा वेळ परमेश्वरानें सर्वांना वाटून देतांना गरीब श्रीमंत, थोर, किंकर, सुज्ञ अज्ञ, हा भेदभेद केलेला नाहीं. वेळ ही चीज उसनी देतां येत नाहीं किंवा घेतां येत नाहीं. श्रीमंत पैशानें दुनियेंत कांहीहि मिळवूं शकेल पण अगणित पसा मोजूनहि त्याला एकसुद्धां पळ अधिक मिळूं शकत नाहीं. व्यासपीठा-वरली ही विचारसरणी कामचलाऊ आधार म्हणून ठीक वाटली तरी व्यवहारांत मात्र त्यांचा खोटे-पणा नेहमीं प्रत्ययास येतो. वेळच्या वेळीं काम करण्याची सक्ति फक्त गरिबानांच असते. श्रीमंत मात्र वेळेची तमा बाळगत नाहींत. चकचकीत मोटारींतून भर्रकन् ऑफिसांत येणारा वरिष्ठ अधिकारी आगगाडींतून लोंबकळत येणाऱ्या कारकुनाला उशीर झाला कीं दंड करतो. तसेंच आलिशान हॉटेलांत ' बिझिनेस लंच ' चापून मोटारींतून परतणारा साहेब भोजनगृहांत खुर्चीपाठीमागें नंबर लावून रखडणाऱ्या कारकुनाला लंचटाईम अधिक घेतल्याबद्दल दम देतो. ऑफिसांतल्या शिपायांना तर स्वताचा असा फुरसतीचा असा वेळ नसतोच ज्या परमेश्वरानें एकाला पुढारी करून दुसऱ्याला शिलेदार केलें त्यानेंच एकाला साहेब व दुसऱ्याला कारकून केलें आहे. आणि हें जर खरें असेल तर वेळेची लोकशाही परमेश्वरी राज्यांत नांदते हें तरी खरें कसें मानायचें ?

एका विद्वान संख्याशास्त्रज्ञानें वक्तशीर माणसाच्या आयुष्यांतील तेरा वर्षांच्या कालखंडाचा हिशेब मांडतांना असें दाखवून दिलें आहे कीं हा माणूस ह्या तेरा वर्षांत अहर्निश चार वर्षे झोंप घेत होता. त्याची २·८७५ वर्षे फक्त काम करण्यांत खर्च झालीं तर १·३७५ वर्षे जेवणासाठीं खर्ची पडलीं. रोजच्या प्रवासांत त्याचीं १·८६ वर्षे वापरलीं गेलीं तर १·५५७ वर्षे स्नानदाढीच्या सोपस्कारांसाठीं वापरलीं गेलीं. असा हिशेब करतां शिल्लक राहिलेल्या १·३३३ वर्षांचा मात्र कांहींच अंदाज लागत नाहीं. आयुष्यांत वक्तशीरपणें वागणाऱ्या माणसाच्या जीवनाची जिथें अशी परवड तिथें इतरांची काय कथा ! आयुष्यांतील काळाचा असा हिशेब मांडून वेळ फुकट जातो अशी हाकाटी माणूस करूं लागला तर उद्यां उजेडाचा आणि पावसाचाहि हिशेब करून त्यांची उधळपट्टी होत आहे अशीहि तो तक्रार करील.

काळाच्या अथांग गुहेंत वेळेचें अनंत भांडार भरलेलें आहे. तें उपभोगायचें असेल तर माणसानें आज, आतां, याक्षणीं हे शब्द विसरायला पाहिजेत. निसर्गसुद्धां कधीं वक्तशीरपणा पाळत नाहीं. सूर्य चंद्र कुठें दररोज त्याचवेळीं उगवतात, मग माणसानें तरी ही अनैसर्गिक वृत्ति कां आचरावी ? आधुनिक जगांतला सर्वोच्च शोध म्हणजे ' उद्यां ' हा शब्द. उद्यां सतत उगवणार आहे हें ध्यानांत ठेवून मानवानें ' आज ' ची खंत करतां कामा नये. आजचा मानव जेव्हां ह्या उद्यांचें महत्त्व जाणेल तेव्हांच तो खरा सुखी होईल. ज्याला वक्तशीर काम करायचें असतें तो आपलें घड्याळ पुढें सारून ठेवत असतो. आपल्या घड्याळांतले आजचे तास जर उद्यांवर ढकलले तर वेळच्या वेळीं काम केल्याचें श्रेय आपोआप मिळून निष्कारण घाईहि होणार नाहीं. " जें काम आज करतां येईल तें उद्यां करा " असा संदेश एका थोर साहित्यिकानें स्वाक्षरीसह मला लिहून दिला आहे आणि तोच खरा मी उत्कर्षाचा महामंत्र मानितों.

(ऑल इंडिया रेडिओच्या सौजन्यानें)

अनुक्रमणिका







चाललेली अविरत धडपड दिसून येते.

काँग्रेसचे अध्यक्ष संजीव रेड्डी यांच्या भाषणांतील दहा वर्षांच्या सातत्यानंतर काँग्रेसवाल्यांनीं अधिकारपदाचा सक्तीनें त्याग करावा, झोनल कौन्सिलना प्रादेशिक सरकारांइतका दर्जा द्यावा, काँग्रेसजनांनीं राष्ट्रीय ऐक्यावर भर द्यावा—या मुद्यांचा काँग्रेसजनांनाच लवकर विसर पडला आहे. कारण यांतील एकहि सूचना अमलांत आणली जाणार नाहीं. पं. नेहरूंनीं काँग्रेसमधील गटबाजीचा निषेध केला. पण उत्तर प्रदेश, आंध्र, म्हैसूर आदि प्रांतांत सत्तेसाठीं चाललेलें राजकारण आणि त्यावर ते स्वतःच कोणताच तोडगा सुचवूं शकत नसल्यामुळें या निषेधाचा सत्तालोलुप कार्यकर्त्यांवर फारसा परिणाम होणार नाहीं आणि त्यामुळें सुमारें ३० लाख रुपये खर्च करून भरविण्यांत आलेलें हें अधिवेशन त्या दृष्टीनें व्यर्थच म्हणावें लागेल.

—गोपालन्

## महाराष्ट्राची जमीनसुधारणा

महाराष्ट्र सरकारनें आपलें जमीनविषयक कमाल धारणेबाबतचें विधेयक प्रसिद्ध करून विरोधक आणि पुरस्कर्ते या दोघांनाहि एकप्रकारें बुचकळ्यांत टाकलें आहे, या विधेयकान्वयें कोरडीं पिकें निघणाऱ्या जमिनीचें ८४ ते १०६ एकर आणि पाटाच्या पाण्याखालील जमिनीचें १६, २४ आणि ४८ एकर कमाल धारणाक्षेत्र ठरवून देण्यांत येणार आहे. अर्थात् पांच माणसांच्याच कुटुंबाला हें कमाल धारणाक्षेत्र लागूं होईल. मात्र भातशेतीखालील आणि विहिरीच्या पाण्याखालीं भिजली जाणारी जमीन कोरड्या जमिनींत गणली जाईल. यापेक्षां अधिक जमीन असल्यास ती सरकार ताब्यांत घेईल आणि भूमिहीनांना वाटण्यांत येईल. अर्थात् ज्यांच्या जमिनी काढून घेण्यांत येतील त्यांना सरकार नुकसानभरपाई देणारच.

जमीनविषयक या विधेयकानें महाराष्ट्रांतील साखर कारखानदारांत मोठीच खळबळ उडविली आहे. चेंबर ऑफ कॉमर्सचे अध्यक्ष श्री. लालचंद हिराचंद यांनीं या बिलाला कडाडून विरोध केला आहे. कारण या विधेयकामुळें साखरकारखानदारांनीं बऱ्यावाईट मार्गानें मिळविलेल्या जमिनी त्या त्या मालकांना परत मिळतील आणि ते शेतकरी सहकारी तत्त्वावर उसाची निर्मिति करून तो ऊस कारखानदारांना विकतील. मुळांत नियोजनमंडळाचा याला विरोध होता.

नियोजन मंडळाच्या मतें साखर कारखान्यांच्या मालकीची आणि भाड्यानें असलेली जमीन या विधेयकांतून वगळावी. पण मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनीं हा संभाव्य विरोध लक्षांत घेऊनहि नियोजनमंडळाला आपलें म्हणणें पटवून दिलें. चेंबर ऑफ कॉमर्सच्या माहितीनुसार आज उसाच्या लागवडीखालीं महाराष्ट्रांत एकूण ३ लाख एकर जमीन असून ती त्यांतील बहुतेक जमीन साखर कारखान्यांच्या ताब्यात आहे. आतां या कायद्याप्रमाणें सरकारनें ही जमीन ताब्यांत घेतली म्हणजे साखर कारखानदारांची मक्तेदारी संपणार. कारखानदारांच्या मतें आपण कित्येक वर्षे त्याग करून या जमिनींची उत्तम मशागत केली आणि आतां या जमिनी परत शेतकऱ्यांना दिल्यास त्यांच्या हातून आम्हीं जेवढें काढतों तेवढें उत्पन्न निघणार नाहीं आणि पर्यायानें महाराष्ट्रांतील साखर धंद्याचें अपरिमित नुकसान होईल. फेब्रुवारी महिन्यांत हें विधेयक विधानसभेपुढें जेव्हां मांडलें जाईल तेव्हां हा विरोध कोणत्या थराला जातो हें पाहावयाचें.

— पिनाकि

# समाजकारण

## महाराष्ट्रीय मुद्रकांचा मुंबईतील मेळावा

या ठिकाणीं 'महाराष्ट्रीय' हा शब्दप्रयोग जातीय नसून स्थलवाचक समजावा. कारण या मेळाव्यांत गुर्जरबंधू, बोहरी, पारशी यांचाहि समावेश होता. महाराष्ट्रीय मुद्रण परिषद ही महाराष्ट्रांतील सर्वसाधारणपणें छोट्या छापखानदारांची (महाराष्ट्रांत बहुसंख्य छापखाने छोटेच आहेत) मध्यवर्ती संघटना असून जिल्हा संघटना (लोकल असोसिएशन) तिचे संलग्न सभासद आहेत. महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेनंतर मुंबईचा मुद्रक संघ या संघटनेला जोडला गेला. साहजिकच या वर्षीचें अधिवेशन (क्रमांकानें दहावें) मुंबईसच भरावें यांत आश्चर्य नाहीं. डिसेंबरची ३१ तारीख आणि नव्या वर्षाचा पहिला दिवस असे दोन दिवस शिवाजीपार्कवरचें बालमोहन विद्यामंदिर मुद्रकांच्या मेळाव्यानें गजबजून गेलें होतें. या अठ्ठेचाळीस तासांच्या अवधीत छपाईची प्रत अधिक चांगली आणि अधिक लवकर कशी करतां येईल आणि मुद्रणग्राहकांना पूर्ण समाधान कसे देतां येईल या दृष्टीनें पुष्कळ उपयुक्त बोलणीं झालीं, चर्चा झाल्या आणि दिग्दर्शनहि झालें. या मेळाव्याचें यजमानत्व मुंबईंतील बृहन्मुंबई मुद्रक संघ या मुख्यत्वें छोट्या मुद्रकांच्या संघानें स्वीकारलें होतें. 'छोट्या' या शब्दप्रयोगाला एक विशिष्ट अर्थ आहे. आपल्या शहरांत बऱ्याचशा छोट्या छापखान्यांप्रमाणें कांहीं बडे छापखाने आहेत. आणि हे छापखानदार स्वतःची जमातच वेगळी समजतात. ते स्वतःला 'इन्डस्ट्रिआलिस्टस्' मानतात. या उद्योगपतींचा सुद्धां एक संघ आहे. त्याचें नांव : 'बॉम्बे मास्टर प्रिन्टर्स' आपल्या 'बड्या दादांना' परिषदेला पाचारण करण्यासाठीं छोट्या संघाचे अध्यक्ष गेले असतां दादांनीं त्यांना 'आमच्याशीं कॉम्पिटिशन करूं पाहातां! आम्ही नाहीं तुमच्याशीं सहकार्य करणार!' असें सांगून टाकलें.

तरीहि नाउमेद न होतां बृहन्मुंबई मुद्रक संघानें महाराष्ट्रभर (नागपूर-विदर्भ-मराठवाड्यासह) पसरलेल्या शेंकडों मुद्रकबंधूंना म. मु. परिषदेच्या दहाव्या अधिवेशनाच्या निमित्तानें एकत्र आणलें, त्यांना आपलीं सुखदुःखें बोलूं दिलीं, अडचणी सांगायला लावल्या आणि परस्पर सहकार्याची मेख पुन्हा एकदा घट्ट केली.

यापूर्वी पुणें, सोलापूर, नाशिक, सांगली, नगर, जळगांव इत्यादि हीं अधिवेशनें भरविण्यांत आलीं होतीं. मुंबईतलें हें पहिलेंच अधिवेशन.












# शेवटचें पान

## धन्यवाद !

स. न. •

'आपला डिसेंबर ६० चा अंक पाहिला. हिंदुस्थानच्या प्रागैतिहासिक कालावर आधारलेली कुंदा- पारसनीस ह्यांची कथा फार आवडली. हरप्पा आणि हरियूपीया ( यू दीर्घ ) ह्यांच्या एकत्वाविषयीं जरी संशय असला तरी ऋग्वेदांत आलेल्या आर्यशत्रूंच्या अर्थात् एतद्देशीयांच्या नांवाचा चांगला उपयोग केला आहे. ऋग्वेदांतील कांहीं मंत्रांचाहि दोन वंशांतील जीवनकलहाच्या पार्श्वभूमीवर युद्धगीतें म्हणून फारच चखल उपयोग केला आहे. स्टयुअर्ट पिगट ह्या सुप्रसिद्ध इतिहासकारानें आपल्या परीनें पुराव्यानिशीं असें सिद्ध केलें आहे कीं रानटी आर्यांनीं एतद्देशीय सुसंस्कृत द्रविडांच्या सुस्थित, सुशासित शहरांचा नायनाट केला. शत्रुंचें शेवटचें भाषण जरी थोडें अनैसर्गिक आणि अतिरेकी द्रष्टत्वाचें वाटलें तरी प्रागैतिहासकालीन वातावरण निर्माण करण्यांत कुंदा पारसनीस खासच यशस्वी झाल्या आहेत. एक सुंदर लघुकथा लिहिल्याबद्दल लेखिकेला धन्यवाद.

—बाळ गांगल

## डोळ्यांचे समाधान झाले

सप्रेम नमस्कार,

आपला दिवाळी अंक समग्र वाचला. आणि डोळे भरून पाहिला. मनाचें आणि डोळ्यांचें सारखेंच समाधान झालें. अभिनंदन !

माझ्या साहित्याला अगत्यानें स्थान दिल्याबद्दल अत्यंत ऋणी आहें.

— शिरीष पै.

## दीपावलीकडून फार अपेक्षा आहेत.

स. न.

दिवाळी अंक सर्वोत्कृष्ट. त्याच्या पावलावर पाऊल टाकून नेहमीचा अंक निघावा. या वर्षी कोणत्या प्रवासवर्णनाचा जुलूम करणार ? जत्रेंतील चित्रांची आशा आहे काय ? 'परमेश्वर आणि मी' या सदराला मी तरी कंटाळलोंय.

दीपावलीकडून आमच्या फार अपेक्षा आहेत म्हणून हा प्रपंच, त्याचा राग नसावा.

— द्वारकानाथ कारखानीस, दादर

## स्त्रियांवर अन्याय

स. न.

दीपावली दिवाळी अंकांतील मराठी माणूस या परिसंवादांत आपण स्त्रियांच्या वाट्याला अवघं एक पान देऊन आपल्या नेहमीच्या वृत्तीला अनुसरून स्त्रियांवर किंचित् अन्याय केला असें मला तरी वाटतें.

अंकांतील शिरीष पै यांची कौटुंबिक कथा जिवाला चटका लावते. द. ग. गोडसे यांचा लेख अभ्यासजड वाटतो.

बाकी अंक लोभसवाणा आहे.

—निर्मला प्रभु

---

म्हणूनच तें मोठें ठसकेदार, नीटनेटकें, उत्साहपूर्ण आणि महाराष्ट्र धर्माशीं विसंगत टरावें एवढें कांहीं पद्धतशीर रीतीनें पार पडलें. सर्वच कार्यक्रम घड्याळाच्या ठोक्यासरशीं घडत होते. कोठेहि गोंधळ नाहीं, गडबड नाहीं, भोंगळ कारभार नाहीं. अधिवेशनाचे अध्यक्ष पुण्याचे श्री. शं. रा. उर्फ मामाराव दाते ( काळकर्ते ) होते आणि उद्घाटनाचें काम मुख्यमंत्री श्री. यशवन्तराव चव्हाण यांनी केलें. श्री. मामा दाते यांच्या भाषणांत आशय फारसा मोठा नसला तरी जिव्हाळा ,विलक्षण होता. मुद्रणशिक्षणाचा प्रश्न त्यांनी हिरीरीनें पुढें मांडला होता.

श्री. मामारावांची फारशी ओळख मुंबईकरांना नसावी. त्यांनी आपली देवनागरी लिपी मोनो मशिनवर बसवून दिली. ही त्यांची कामगिरी फार मोठी मानावी लागेल. श्री. मामा दातेनीं पुढें राजकारणांत जादा लक्ष घातलें आणि देवनागरी लिपी लायनो मशीनवर लवकर येऊं शकली नाहीं. आतां आली आहे असें समजतें. पण तिचें वळण अभिमानी मंडळीना मान्य होण्यासारखें नाहीं. खरें म्हणजे हें काम श्री. मामारावानीच पुरे करावयास हवें होतें.

अधिवेशनाला जोडूनच महाराष्ट्रांतील मुद्रणकलेचें एक साक्षेपी प्रदर्शन भरलें होतें. यांत कलेचें नमुने होते आणि तिचें दारिद्र्यहि होतें. प्रदर्शनीय नमुन्यांची निवड बरी होती, पण तें उभे करण्याची पद्धत अधिक आकर्षक होती. या प्रदर्शनांतच गेल्या दोनतीनशें वर्षांच्या अवधींत छापलीं गेलेलीं पुस्तकें पहावयास मिळालीं. या बाबतींत सुप्रसिद्ध संशोधक श्री. अ. का. प्रियोळकर आणि निर्णयसागर छापखाना यांची फार मदत झाली. प्रदर्शन खऱ्या अर्थानें प्रेक्षणीय होते— बड्या दादांच्या कॉन्फरन्समध्यें जीं प्रदर्शनें भरतात त्यापेक्षां अनेक पटीनें अधिक पद्धतशीर होतें असें तज्ज्ञांचें मत पडलें.

कांहीं तज्ज्ञ : जी. क्लॅरिज छापखान्याचें मि. मिडल्टन, कलरकॅफ्टचें श्री. परमेश्वरन्, वकील ॲन्ड सन्सचे श्री. मेहता. 'मोठे दादा,' कमर्शिअल प्रिन्टिंग प्रेसचे श्री. एस. रामू या बाजुस फिरकलेहि नाहींत म्हणे !

प्रस्तुत अधिवेशन संस्मरणीय व्हावें या हेतूनें 'मुद्रिका' या नांवाचें सुव्हेनिर इंग्रजींतून काढले होतें. त्याचीं पृष्ठें मी चाळून पाहिलीं आणि मनाशीचं आश्चर्य प्रकट केलें. अधिवेशनास जमलेला बहुसंख्य समाज महाराष्ट्रीय असतांना हा इंग्रजी प्रकाशनाचा खटाटोप कां ? पण मुद्रिकामधली जाहिरातींची दाटीवाटी पाहतां त्याचे इंगित उमगलें. केवळ जाहिराती मिळविण्यासाठीं महाराष्ट्रधर्मानें हीं भाषिक ताबेदारी पत्करल्याचें समजून आलें. मुद्रिकाचें बाह्यांग बरें वाटलें. म्हणजे मुद्रकांच्या मेळाव्याला तरी विशोभित वाटलें नाहीं. अंतरंग बव्हंशीं जाहिरातीनी व्यापलें आहे. तरीपण मुद्रणशिक्षणासंबंधी चर्चा करणारा. श्री. देशपांडे यांचा एक लेख, श्री. जयंतराव देवकुळे यांचें रचनातंत्रावरचें विवेचन आणि श्री. वाकणकरांनी सिल्कस्क्रीन प्रिन्टिंग वर लिहिलेला लेख असें कांहीं काही साहित्य ठीक वाटलें.

( पान ५३ वर ) .

हें मासिक मालक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें



